स्वतंत्र भारतांत

# लोकराज्य


लेखक

पुरुषोत्तम रामचंद्र लेले, बी. ए. एल्एल्. बी.


पुरस्कार

हरिभाऊ पाटसकर, बी. ए. एल्एल्. बी.
एम्. एल्. ए., घटनापरिषदेचे सदस्य


प्रकाशक

केमकर आणि मंडळी, मुंबई ४

सन १९५०

किंमत १ रु. १२ आणे

स्वतंत्र भारताची स्वतंत्र राज्यघटना ता. २६ जानेवारी १९५० रोजीं अंमलांत आली हें सर्वांना समजलें आहे आणि उमजलेंहि आहे. या घटनेवर कांहीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं असतांना हें आणखी एक पुस्तक कशाला हा प्रश्न उपस्थित होतो. आतांपर्यंत जीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांहून हें पुस्तक निराळ्या तऱ्हेचें आहे हें सांगितलें म्हणजे वरील प्रश्नाचें उत्तर मिळतें. आपली ही राज्यघटना म्हणजे राष्ट्रधर्मस्मृति आहे. या स्मृतीची चिकित्सक छाननी झाली पाहिजे आणि ती ज्यास्तींत ज्यास्त नागरिकांना समजेल अशा भाषेंत झाली पाहिजे असें मानणारे मुंबईतील 'लोकसत्ता' पत्राचे संपादक श्री. महाजनी यांनीं मला या स्मृतीवर लेखमाला लिहावयास सांगितलें आणि मी एकंदर पंधरा लेख लिहिले. साप्ताहिक लोकसत्तेंत ते लेख क्रमशः प्रसिद्ध होत असतांना त्या लेखांचें पुस्तक काढण्याची सूचना अनेकांकडून आली. ती सूचना मला पटली, पण एकाद्या प्रकाशकाला ती पटेपर्यंत मला कांहीं करतां येईना. त्या लेखांपैकीं कांहीं लेख वाचून '**केमकर आणि मंडळी**'चे मालक श्री. श्रीकृष्ण कुलकर्णी व श्री. माधवराव कुलकर्णी, आणि, श्री. पु. दा. कुलकर्णी यांना पुस्तक प्रसिद्ध करण्याची इच्छा झाली तेव्हां अनेकांनीं केलेल्या सूचनेचा कृतीच्या दृष्टीनें मीं विचार केला. साप्ताहिकांतील लेख पुस्तक-रूपांत प्रकट होण्यापूर्वीं त्यांचें बरेंच 'संपादन' (editing) करावें लागलें. मजकुराचा क्रम बदलावा लागला, साप्ताहिकांत प्रसंगोपात आलेला उहापोह गाळावा लागला, खंडशः लेख प्रसिद्ध होत असतांना अपरिहार्य असलेली पुनरुक्ति टाळावी लागली आणि कांहीं नवीन मजकूर लिहावा लागला.

या पुस्तकांत घटनेचें शब्दशः भाषांतर नाहीं. कांहीं भाग संपूर्णतया देऊन वर स्पष्टीकरणहि केलेलें आहे. उलटपक्षीं कांहीं भाग संक्षिप्तपणें दिलेला आहे. ही स्मृति समजण्यास अवश्य असलेला सर्व भाग विस्तृतपणें दिलेला आहे हें सहज दिसून येईल. भारताच्या घटनाकायद्याचे भाग बावीस आहेत आणि या पुस्तकांतहि तितकेच भाग घातले आहेत. सातवा भाग खेरीज करतां घटनेंतील भागाबरहुकूम या पुस्तकांतील भाग आहेत. सातव्या भागाच्या सुरुवातीला तेवढाच अपवाद कां केला आहे याचा खुलासा दिलेला आहे. घटनेंतील सातव्या भागाचा समावेश या पुस्तकाच्या सहाव्या भागांत आहे.

परिभाषेच्या बाबतींत एक खुलासा करणें अवश्य आहे. अजून अधिकृत ( म्हणजे सरकारी ) मराठी भाषांतर प्रसिद्ध झालेलें नाहीं. तें प्रसिद्ध झालें म्हणजे त्यांतील परिभाषा ही प्रमाणभूत मानली जाईल. तोंपर्यंत दरएक लेखकाला आपली परिभाषा निर्माण करणें भाग आहे. या पस्तकांत सुलभतेचें धोरण ठेवलेलें आहे, भाषाशुद्धीचें नव्हे. जे शब्द इंग्रजी असून आपल्या समाजांत रूढ झाले आहेत त्यांचें भाषांतर करण्याचा मीं आग्रह धरलेला नाहीं. पार्लमेंट, कौन्सिल, गव्हर्नर, बजेट, कोर्ट, हायकोर्ट—यांच्यासारखे शब्द आपण आपलेसे करावे अशा मताचा मी आहें आणि म्हणून मीं ते तसेच्या तसे या पुस्तकांत वापरले आहेत.

वर ज्या चार व्यक्तींचा मीं नामनिर्देश केला आहे त्यांचा मी अत्यंत आभारी आहें. राष्ट्रवैभव छापखान्याच्या मालकांनीं व श्रमिकांनीं आपलेपणानें छपाईचें काम केलें याबद्दल त्यांचाहि मी ऋणी आहें.

दे. भ. हरिभाऊ पाटसकर यांनीं कामाचा बोजा आणि आजार या जोड-गोळीची पर्वा न करतां पुरस्कार लिहून पाठवला त्याबद्दल त्यांचे पुरेसे आभार मानावयास माझ्याजवळ शब्दच नाहींत.

या पुस्तकांत ठिकठिकाणीं श्री. मामासाहेब देवगिरीकर बी. ए. ( ऑनर्स ), पार्लमेंटचे सभासद, यांच्या भाषांतराचा उल्लेख व उपयोग केलेला आढळेल. तें भाषांतर वापरावयास त्यांनीं स्वतःच्या वतीनें आणि चित्रशाळेचे ट्रस्टी या नात्यानें मला परवानगी दिली याबद्दल मी त्यांचे आभार मानतों.

पुस्तकांत पं. नेहरूंच्या जोडीला सरदार पटेलांचें नांव आलेलें आहे. पुस्तक प्रसिद्ध व्हावयाच्या आधीं ती जोडी फुटली हा दैवदुर्विलास होय.

ता. ३१ डिसेंबर १९२९ ची मध्यरात्र उलटून गेल्याबरोबर रावी नदीच्या तीरीं पं. जवाहरलाल नेहरू यांनीं काँग्रेसचे अध्यक्ष या नात्यानें हिंदुस्थानच्या पूर्ण स्वातंत्र्याची घोषणा केली. तीच आपली स्वातंत्र्याची खरी तारीख, म्हणून ३१ डिसेंबर रोजीं ‘ स्वतंत्र भारतांत लोकराज्य ’ प्रसिद्ध केलें जात आहे.

ताराबाग-गिरगांव
मुंबई, ता. ३१-१२-५०

**पुरुषोत्तम रामचंद्र लेले**

---

# अनुक्रमणिका

| भाग | शीर्षक | | | पृष्ठ |
|---|---|---|---|---|

# पुरस्कार

श्री. पु. रा. लेले यांचा घटनाशास्त्राचा अभ्यास खोल असून त्यांनीं हिंदी घटनेवर बरेच लेख लिहिले आहेत. जगांत ज्या कांहीं थोड्या लिखित घटना आहेत त्यांपैकीं हिंदी घटना ही अगदीं अलीकडील घटना आहे. स्वाभाविकपणें इतर लिखित घटनांचा परिणाम या घटनेवर थोडाफार झाल्याचें दिसत आहे. इंग्लंडची घटना ही मुख्यत्वेंकरून लिखित घटना नाहीं परंतु इंग्रजी राज्यकर्त्यांनीं निरनिराळ्या वेळीं जे कायदे हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेकरितां इंग्लिश कायदेमंडळाद्वारें केले त्या कायद्यांचेवर देखील या इंग्रजी अलिखित घटनेच्या कांहीं तत्त्वांचा परिस्थित्यनुसार बदललेल्या स्वरूपांत परिणाम झालेला होता. अशा कायद्यांपैकीं शेवटचा व्यापक कायदा हा १९३५ चा हिंदुस्थान सरकारचा कायदा या नांवानें प्रसिद्ध होता. तो कायदा संपूर्णतया शेवटपर्यंत अमलांत आला नाहीं. परंतु त्यांतील प्रांतिक सरकारचे कारभारापुरता भाग अंमलांत आला. तथापि या १९३५ च्या कायद्याप्रमाणें अंमलांत आलेली राज्यव्यवस्था तसेंच त्या कायद्यानें निर्माण केलेल्या परंतु अंमलांत न आणल्या गेलेल्या राज्यव्यवस्थांचाहि परिणाम नवीन घटनेवर बऱ्याच प्रमाणांत झालेला आहे. त्यांत कांहीं विशेष अस्वाभाविक आहे असें नाहीं. कोणतीहि लिखित घटना निव्वळ तात्त्विक स्वरूपाची असणें हितावह नाहीं. ज्या देशाची ती घटना असेल त्या देशांतील ऐतिहासिक व इतर घडामोडी व परिस्थिति यांचेशीं सुसंगत अशीच ती घटना असावयास पाहिजे. याच दृष्टीनें ता. २६।१।१९५० पासून अंमलांत आलेल्या हिंदी घटनेकडे पहावयास पाहिजे.

हिंदी घटना तयार होण्यास सुमारें तीन वर्षांचा काळ लागला. हा तीन वर्षांचा काळहि हिंदुस्थान देशांतील महान् संक्रमणाचा काळ होता व या काळांत ज्या ऐतिहासिक महत्त्वाच्या गोष्टी घडल्या त्यांचेहि या घटनेवर फार दूरगामी परिणाम झाले. घटनासमितीची निवड झाली त्या वेळीं ती फक्त घटना तयार करण्याकरितांच

नेमलेली समिती म्हणून तिची निवड झाली. त्या वेळीं आपला देश हा अविभागलेला एकजिनसी व अखंड असा देश होता. त्या वेळचे निवड झालेले मुस्लिमलीगचे सदस्य त्या समितीबरोबर त्या वेळीं असहकार करीत असून त्यांनीं त्या समितीवर बहिष्कार घातलेला होता.

कार्याच्या आरंभीं घटनेच्या उद्दिष्टांच्यासंबंधीं एक विचारपूर्वक ठराव ता. १३–१२–१९४६ इसवी रोजीं पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं मांडला व तो ठराव ता. २२–१–१९४७ रोजीं सर्वानुमतें पास करण्यांत आला. त्या ठरावाचा निर्देश हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा जाहीरनामा असा करण्यांत येतो. त्या ठरावांत तीन महत्त्वाचीं उद्दिष्टें नमूद करण्यांत आलीं होतीं:—

(१) हिंदुस्थान हें एक स्वतंत्र सार्वभौम लोकसत्ताक राज्य (Republic) असेल. (२) हिंदुस्थान हें एक संघराज्य (Union) राहील व (३) त्या संघांतील निरनिराळीं राज्यें हीं स्वायत्त (Autonomous) घटक असतील व संघराज्याला देण्यांत येतील ते अधिकार व हक्क सोडून बाकीचे सर्व शासनसंस्थेचे अधिकार व हक्क या घटक राज्यांकडे राहतील.

या ठरावानंतर संघराज्याचे अधिकार ठरविण्याकरितां एक कमिटी (युनियन पावर्स कमिटी) नेमण्यांत आली व त्या कमिटीचा रिपोर्ट ४।७।१९४७ रोजीं प्रसिद्ध करण्यांत आला. त्या रिपोर्टांत संघराज्याची वरील कल्पना कायम होती व त्यामध्यें या संघराज्याचा निर्देश (Federation) या नांवानें केलेला आहे.

परंतु त्यानंतर देशांत दूरगामी अशा घडामोडी झटपट घडत होत्या. ता. १५।८।१९४७ ला हिंदुस्थानांतील रहिवाशांना स्वातंत्र्य मिळालें परंतु त्याचबरोबर देशाचीं तीन शकलें झालीं. पूर्व पाकिस्तान व पश्चिम पाकिस्तान म्हणून दोन टोकाला निर्माण झालेल्या दोन तुकड्यांचें पाकिस्तान म्हणून एक नवीन राष्ट्र निर्माण झालें. देशाच्या या फाळणीमुळें जी मानवी संहाराची व नाशाची लाट उसळली तिला इतिहासांत देखील क्वचितच तोड आढळून येईल. त्याच वेळीं घटनासमिती ही फक्त घटना तयार करण्यापुरतीच मर्यादित समिती न राहतां तिचेंच रूपांतर हिंदुस्थान देशाचें मध्यवर्ति कायदेमंडळ म्हणूनहि झालें. या ऐतिहासिक व दूरगामी गोष्टींचा परिणाम घटनासमितीचे कामावरहि

झाल्याशिवाय राहिला नाहीं. घटनासमितीनें आरंभीं ठरविलेल्या उद्दिष्टांच्या बाह्य स्वरूपांत बदल केला गेला नसला तरी आंतील तपशिलाच्या स्वरूपामध्यें (Contents) बदल करण्यांत आला आहे.

जागतिक परिस्थितीमुळें हिंदुस्थानला ब्रिटिश राष्ट्रकुटुंबामध्यें (Common wealth) राहणें जरूर, इष्ट व हितावह वाटलें. परंतु त्याचा परिणाम नामतः तरी हिंदुस्थान हें एक स्वतंत्र, सार्वभौम, लोकसत्ताक राज्य राहिलें नाहीं ही गोष्ट उघड सत्य आहे. उद्दिष्टांतल्या प्रथम उद्दिष्टांत हा बदल करावा लागला आहे.

संघराज्य ( Union ) ही कल्पना बाह्यतः कायम ठेवण्यांत आली असली तरी त्या कल्पनेला अनेक ठिकाणीं व अनेक प्रकारांनीं मुरड घालण्यांत आली आहे. देशाच्या फाळणीमुळें व तज्जन्य भीषण व अमानुष प्रकारांमुळें घटना तयार करणारांचे मनावर इतका परिणाम झाला कीं केंद्रिय सरकार बळकट केलें पाहिजे या कल्पनेनें सगळेच भारावले गेले. केंद्रिय सरकारची बळकटी कशांत व ती बळकटी कोणत्या साधनांनीं व मार्गानीं आणावयास पाहिजे या बाबतची दृष्टि साफ राहिली नाहीं. चालू राजकीय घडामोडी व सरकारपुढें उभ्या राहिलेल्या दैनंदिन अडचणी यांच्या संपर्काचाहि परिणाम घटनासमितीच्या कामावर झाला. तत्त्वपालनांचा उत्साह ओसरूं लागला. संघराज्याचे मूळचे कल्पनेप्रमाणें संघराज्याची बळकटी त्या संघांतील घटकराज्यांचे बळकटीवरच आधारलेली होती. परंतु त्या मूळ कल्पनेंत बदल झाला. घटनासमितीनें नेमलेल्या निरनिराळ्या कमिटीच्या रिपोर्टांचे वेळीं व ते रिपोर्ट घटनासमितीनें विचारांत घेतले त्या वेळीं ( कायदे करण्याचे भार्षेत त्याचें स्पष्टीकरण करावयाचें म्हटल्यास या घटनाकायद्याचे पहिले वाचनाचे वेळीं ) संघराज्य निर्माण करण्याची कल्पना बहुतांशीं कायम होती. परंतु नंतर घटनेच्या मसुद्याचा विचार करण्याचे वेळीं (म्हणजे दुसरे वाचनाचे वेळीं ) या कल्पनेचे बाबतींत अनेक बदल करण्यांत आले. सज्ञान मतदान ( Adult Franchise ) भीतिदायक वाटूं लागलें, व जरी तें कायम ठेवण्यांत आलें तरी या भीतीचा परिणाम म्हणून घटक राज्यांची स्वायत्तता ही राष्ट्रीय आपत्ति भासूं लागली. घटक राज्यांचा राज्यपाल हा लोकनियुक्त असावा असें ठरलें

होतें, तें बदलून तो राष्ट्रपतीनें नेमलेला असावा असा बदल करण्यांत आला. उर्वरित हक्क (Residuary power) घटक राज्यांकडून काढून घेण्यांत येऊन ते संघराज्याला देण्यांत आले.

घटकराज्यांतील निवडणुकीचे अधिकार, जे पूर्वी घटक राज्यांचेकडे ठेवण्यांत आले होते, ते संघराज्याकडे सोंपविण्यांत आले. इतकेंच नव्हे तर घटक राज्याकडे सोंपविण्यांत आलेल्या विषयांसंबंधीं देखील कायदे करण्याचा अधिकार संघराज्याचे विधिमंडळाला देण्यांत आला. आर्थिक योजनेप्रमाणें देखील घटकराज्यांना बहुतांशी संघराज्यावरच अवलंबून राहावें लागेल अशी व्यवस्था करण्यांत आली. त्यांचे उत्पन्नांचे मार्गही फारच तुटपुंजे ठरविण्यांत आले. राज्यपाल हा नुसता घटनाप्रमुख (Constitutional Head) राहिला नसून त्याला घटक राज्यांतील मंत्र्यांचे कारभारांत हात घालण्यास अवसर करून देण्यांत आला आहे. याप्रमाणें १९३५ च्या कायद्याप्रमाणें ज्यांना 'प्रान्त' म्हणण्यांत येत असे त्यांना आज जरी 'राज्य' हें नांव प्राप्त झालें असलें तरी ते अधिकारानें व वस्तुतः पूर्वींच्या प्रान्ताप्रमाणेंच आहेत. आपल्या देशांतील अंतर्गत परिस्थितीमुळें अगर देशाबाहेरील परिस्थितीमुळें देशांतील मध्यवर्ती सरकार बळकट असावयास पाहिजे याबद्दल दुमत क्वचितच असूं शकेल. परंतु संघराज्याचें मध्यवर्ती सरकार व जुनें परकीय मध्यवर्ती सरकार यांचे अधिकारांचे व बळकटीचे उगमस्थानांतच बदल आहे. संघराज्याचें मध्यवर्ती सरकार ज्या प्रमाणांत घटकराज्यें संतुष्ट व बळकट असतील त्याच प्रमाणांत बळकट असूं शकेल. संघाराज्याच्या शक्तीचा उगम घटकराज्यांत असावयास पाहिजे. पूर्वींच्या मध्यवर्ती सरकारच्या शक्तीचा उगम परकीय सत्तेंत होता. व त्या सत्तेच्या सोयीकरतां मध्यवर्ती सरकारचे वर्चस्वाखालीं निर्माण केलेले निरनिराळे प्रांत होते. अहेतुकपणें व परिस्थितीमुळें घटनेच्या मूळ उद्दिष्टांतील संघराज्याचे मूळ कल्पनेंत याप्रमाणें बदल झाला आहे, त्याचे परिणाम काय होतील हें फक्त भावी इतिहासच अचूक ठरवूं शकेल.

लिखित घटना व कायदा या दोन गोष्टींत मूलतः फरक आहे. घटना ही भावी कायद्यांची आधारभूत योजना असावयास पाहिजे. कायदे हे

वेळोवेळीं मानवी समाजाच्या स्थित्यंतराबरोबर बदलणें अपरिहार्य व स्वाभाविक आहे. अशा कायद्यांच्या आधारभूत तत्त्वांचा फक्त उल्लेख घटनेमध्यें यावयास पाहिजे. परंतु १९३५ चा जुना हिंदुस्थानसरकारबाबतचा कायदा डोळ्यांपुढें असल्यामुळें व तो अंगवळणी पडल्यामुळें कायदा व घटना यांतील फरक स्पष्ट व ढळढळीतपणें घटना तयार करतांना लक्षांत राहिला नाहीं व त्यामुळें घटना फार विस्तृत झाली. १९३५ च्या जुन्या कायद्यामध्यें ३२१ कलमें व ८ परिशिष्टें होतीं, व या घटनेमध्यें ३९५ कलमें व ८ परिशिष्टें आहेत. निवडणुकीबाबतचीं सर्व कलमें ज्या भागांत आहेत तो भाग व कलमें कॅनडाच्या विधिमंडळाच्या एका कायद्यावर आधारलेलीं आहेत. खरोखर यासंबंधींही लोकसभेकडून कायदा पास करून घेणें अधिक युक्त झालें असतें. अशा आणखीहि पुष्कळ बाबी आहेत कीं ज्या लोकसभेच्या एकाद्या कायद्यांत योग्य दिसल्या असल्या. परंतु घटनेंत त्या बाबी घालण्याची आवश्यकता नव्हती व त्याठिकाणीं त्या विसंगत आहेत.

मनुष्यनिर्मित कोणतीही गोष्ट तंतोतंत पुरी व बरोबर असूं शकत नाहीं. त्याप्रमाणें आपली घटना ही बिनचुक (faultless) आहे असें म्हणतां येणार नाहीं. तरी जगांतील सर्व लिखित व बिनलिखित घटनांचा विचार करून, पूर्वीच्या राज्यव्यवस्थेची परंपरा जमेस धरून व अंतर्गत व बाहेरील स्फोटक परिस्थितीचा पूर्ण विचार करून ही घटना तयार करण्यांत आली हें खास. तिच्यांत दोष दाखविणें सोपें आहे. परंतु घटनासमितीच्या कार्याच्या तीन वर्षांच्या काळाकडे पाहतां, तेथील निरनिराळे विचार प्रवाह लक्षांत घेतां, देशांतील सामाजिक व आर्थिक विषमतेचा विचार करतां व देशांतील धार्मिक मतभेद व त्यांचे नांवावर आजवर करण्यांत आलेले अनेक समाजविरोधी प्रकार पाहतां, ही घटना निर्दोष नसली तरी दुसऱ्या कोणत्याहि घटनासमितीस यापेक्षा कमी दोष असलेली घटना तयार करतां आली नसती असें माझें निश्चित मत आहे.

दोष असतील ते कालांतरानें काढले जातील व तशी व्यवस्था घटनेंतच ठेविली आहे. परंतु स्वतंत्र हिंदुस्थानला आपलें स्वातंत्र्य कायम टिकवून आपलें भवितव्य उज्वल करण्याला हें एक सामर्थ्यवान साधन प्राप्त झालें आहे हें

निःसंशय ! या घटनेची ज्या प्रमाणांत व जितकी माहिती सर्वसाधारण नागरिकास होईल तितक्या प्रमाणांत ही घटना उपयोगी ठरणार आहे. योग्य माहितीवर आधारलेली मतभिन्नता लोकशाहीव्यवस्थेंत उपयुक्त ठरते. अशी बरोबर व सर्वांगीण माहिती या दुर्बोध विषयाबद्दलची श्री. पु. रा. लेले यांनीं या पुस्तकांत दिलेली आहे. महाराष्ट्रांतील सामान्य इसमाची भाषा मराठी आहे. त्या भाषेंत इतक्या सुलभ रीतीनें ही माहिती देऊन ती सर्वसाधारण मराठी वाचकाला उपलब्ध करून दिल्याबद्दल श्री. पु. रा. लेले हे अभिनंदनास पात्र आहेत.

चाळीसगांव
ता. २३।१२।५०

हरी विनायक पाटसकर

# प्रस्तावना

" या ठिकाणीं उभा असतांना माझ्या मनांत अनेक तऱ्हेच्या विचारांची गर्दी झाली आहे व मी अगदीं भारावून गेलों आहें. जुन्या युगाचा अंत जवळ आला असून आपण लवकरच नव्या युगांत प्रवेश करूं. अशा वेळीं माझें मन ५००० वर्षांपूर्वींच्या उज्ज्वल भूतकालाकडे, हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाकडे धांव घेत आहे आणि जगाच्या प्रारंभापासून आतांपर्यंतचा काल माझ्या डोळ्यांपुढें तरळत आहे. . .हिंदुस्थानच्या इतिहासांतील एका क्रांतिकारक क्षणीं आपण येथें जमलों आहोंत. . .अशा क्षणांत विलक्षण संज्ञा असते यांत शंका नाहीं. अंधाऱ्या रात्रीचें दिवसाच्या प्रकाशांत स्थित्यंतर व्हावें, आणि मेघाच्छादित आकाशांतील ढग वितळून जाऊन सूर्यदर्शन व्हावें म्हणजे जसें वाटतें तसें आज मला वाटत आहे. . .आज आपण बदलत्या कालाच्या सीमेवर उभे असून नव्या युगांत शिरण्यासाठीं झगडत आहों. या समयाचें गांभीर्य व पावित्र्य या सभागृहाला पटेल आणि त्या दृष्टीनें या ठरावाकडे सभासद पहातील अशी मला खात्री वाटते."

स्वतंत्र भारताची राज्यघटना कोणच्या महामंत्रानें प्रेरित झाली पाहिजे तें सांगणारा ठराव भारताच्या घटनासमितीपुढें सन १९४६ च्या डिसेंबरमध्यें मांडतांना पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं वरील स्फूर्तिदायक उद्गार काढले. भारताच्या घटनासमितीची पहिली वैठक ता. ९ डिसेंबर १९४६ रोजीं भरली आणि घटनामंजुरीची शेवटची तारीख २६ नोवेंबर १९४९ ही होती. डॉ. आंबेडकरांनीं सांगितल्याप्रमाणें स्वतंत्र भारताची घटना बनविण्यांत दोन वर्षें, अकरा महिने व सतरा दिवस गेले. समितीच्या किंवा परिषदेच्या अकरा बैठकी झाल्या आणि त्यांना १६५ दिवस लागले. या परिषदेला ३१ कोटी ९० लक्ष जनतेच्या भवितव्याचा विचार करावयाचा होता. धर्मभेद व जनीं देशी संस्थानें हे दोन दुस्तर खंदक ओलांडावयाचे होते. ता. २२ नोवेंबर १९४९ पर्यंत झालेल्या खर्चाचा आंकडा रु. ६३, ९६, ७२९ होता. आपले पहिले राष्ट्रपति आणि घटनापरिषदेचे अध्यक्ष परमपूज्य डॉ. राजेन्द्र प्रसाद यांनीं 'हा खर्च फार आहे असें म्हणतां येणार नाहीं' असें मत दिलें.

हे सगळे आंकडे देण्याचा उद्देश हा कीं भारतासारख्या विस्तीर्ण देशाची स्वतंत्र राज्यघटना बनवतांना खर्च किंवा वेळ यांकडे पहावयाचें नसतें तर पंडित जवाहरलालजींनीं सांगितल्याप्रमाणें साध्य वस्तूच्या गांभीर्याकडे आणि पावित्र्याकडे पहावयाचें असतें. हौसेला मोल नाहीं अशी म्हण आहे. पण पवित्र वस्तूचें मोल आपण तोलणें योग्य होईल का? ता. २६ नोव्हेंबर १९४९ रोजीं घटनापरिषदेनें मंजूर केलेल्या आणि ता. २६ जानेवारी १९५० रोजीं अंमलांत आलेल्या स्वतंत्र भारताच्या घटनाकायद्यानें केवढी क्रांति केली? सवाशें दीडशें वर्षे आपण इंग्लंडच्या राजाची प्रजा होतों. आतां आपण भारताचे नागरिक झालों आहोंत. आपली मालमत्ता दुसऱ्याच्या ताब्यांत होती, आपण जसे कांहीं अज्ञान होतों आणि दुसरा आपलें पालन व आपल्या मालमत्तेचें जतन करीत होता. आतां आपण सज्ञान झालों आहों, आपली मालमत्ता आपल्या हातांत आली आहे, आपण आतां संपूर्ण मालक झालों आहों. स्वातंत्र्य ही अमोलिक चीज आहे. तें मिळवतांना काय किंवा तिला बळकट पायावर उभारतांना काय मोल किती द्यावें लागेल याचा कोणी स्वाभिमानी माणूस विचार करीत नाहीं.

ज्या घटनासमितीची पहिली बैठक ता. ९ डिसेंबर १९४६ रोजीं भरली ती हिंदुस्थानांतील सहा कोटी लोकांनीं अप्रत्यक्षपणें निवडली होती. त्यावेळीं तिच्या अधिकाराबद्दल वानवाच होती. सत्तान्तरानंतर घटनापरिषदा भरतात असें इतिहास सांगतो. ही घटनापरिषद सत्तान्तरासाठीं भरली होती. पण हिंदुस्थानच्या पुढाऱ्यांनीं मोठें धैर्य आणि विलक्षण आत्मविश्वास दाखवून घटनापरिषदेची योजना स्वीकारली आणि अनंत अडचणींना तोंड देऊन ती यशस्वी केली. दुसरें महायुद्ध संपल्यानंतर लगेच इंग्लंडच्या राजेसाहेबांनीं एक घोषणा केली. अर्थात् ही घोषणा मजूरपक्षाच्या मंत्रिमंडळाची होती. त्या घोषणेंत हिंदुस्थानांत पूर्ण स्वराज्य स्थापन करण्यासाठीं इंग्रज सरकार हिंदी पुढाऱ्यांचें सहकार्य घेऊन ज्यास्तींत ज्यास्त प्रयत्न करील असें सांगितलें. ही घोषणा १५ आगष्ट १९४५ रोजीं केलेली होती. ता. १५ मार्च १९४६ रोजीं मि. ॲटली, इंग्लंडचे मुख्य प्रधान, यांनीं पार्लमेंटमध्यें जी महत्त्वाची घोषणा केली त्यांत त्यांनीं हिंदुस्थानचा पूर्ण स्वतंत्र होण्याचा म्हणजे ब्रिटिश

कॉमनवेल्थच्या बाहेर जाण्याचा हक्क मान्य केला. जी घटनापरिषद ता. ९ डिसेंबर १९४६ रोजीं सुरु झाली ती या पायावर उभारलेली असल्यामुळें तांत्रिक चर्चेच्या भानगडींत आमच्या देशाचे पुढारी पडले नाहींत. त्यांनीं केलें तें योग्य केलें असेंच इतिहास सांगेल.

तांत्रिक दृष्टया घटनापरिषदेला लोकांपासून अधिकार मिळाला नसला तरी जो ठराव पंडित जवाहरलाल नेहरूंनी परिषदेपुढें मांडला आणि जो मांडतांना सुरुवातीस दिलेले उज्ज्वल उद्गार काढले त्यांत लोकांचा स्वयंभू हक्क मान्य केला आणि प्रामुख्यानें मांडला. त्या ठरावांतील मूळ इंग्रजी शब्द पुढें दिल्या-प्रमाणें आहेत:

> " All power and authority of the Sovereign Independent India, its constituent parts and organs of Government, are derived from the people."

[ भाषांतर : स्वतंत्र सर्वाधिकारी हिंदुस्तानची, हिंदुस्तानच्या घटकांची, आणि राज्ययंत्राची सर्व सत्ता आणि अधिकार, यांची उत्पत्ति लोकांपासून झाली आहे.]

पंडित जवाहरलाल नेहरूंनीं मांडलेला ठराव घटनापरिषदेनें मंजूर केला, पण परिषदेच्या कामांत मुसलमान प्रतिनिधींच्या असहकारितेनें अनेक अडचणी आल्या. एक गोष्ट त्या वेळीं अतिशय अनुकूल होती ती ही कीं इंग्लंड-मध्यें मजूर पक्ष प्रचंड बहुमतानें निवडून आला होता आणि त्या पक्षानें हिंदुस्थानचा प्रश्न सलोख्यानें सोडवण्याचें कंकण हातांत बांधलें होतें. घटना-परिषदेच्या पहिल्या बैठकीनंतर दोन अडीच महिन्यांत इंग्लंडच्या मंत्रिमंडळानें घोषणा केली कीं कांहींहि झालें तरी सन १९४८ च्या जून महिन्याच्या आंत इंग्रज आपला हिंदुस्थानांतील अधिकार संपविणार. ही घोषणा करून तें मंत्रिमंडळ थांबलें नाहीं. जुने सेक्रेटरी ऑफ स्टेट व व्हाइसरॉय यांचे राजीनामे घेऊन नवे तरुण व तडफेचे सेक्रेटरी ऑफ स्टेट व व्हाइसरॉय यांची त्या मंडळानें नेमणूक केली. इंग्रज सरकारच्या अधिकारसमाप्तीचा काल फारच अल्प करण्यांत आला. इंग्लंडच्या पार्लमेंटानें जरूर तो कायदा १९४७ च्या जुलैमध्यें मंजूर केला आणि महत्त्वाची गोष्ट ही कीं त्या कायद्याचें नांव

‘ हिंदी स्वातंत्र्याचा कायदा ’ असें ठेवण्यांत आलें. ता. १५ आगष्ट १९४७ रोजीं इंग्रजांनीं आपली सत्ता हिंदुस्थानांतील घटनासमितीच्या स्वाधीन केली. इंग्लंडच्या पार्लमेंटचा हिंदुस्थानासंबंधींचा सर्व अधिकार घटनासमितीच्या सुपूर्द करण्यांत आला. हिंदुस्थानापुरता सर्वाधिकार ज्या घटनासमितीच्या स्वाधीन करण्यांत आला ती ता. ९ डिसेंबर १९४६ रोजीं भरलेल्या घटनासमितीपेक्षां कांहीं अशीं निराळी होती, आणि हिंदुस्थानची व्याप्तिहि निराळी झाली होती. महत्त्वाची गोष्ट ही कीं ता. १५ आगष्ट १९४७ रोजीं घटनासमिति सर्वाधिकारी झाली.

या घटनासमितीनें जी घटना ता. २६ नोवेंबर १९४९ रोजीं लोकांच्या नांवानें मंजूर केली तिच्या प्रास्ताविक भागांत लोकांच्या अधिकाराचा कोठेंहि उल्लेख नाहीं. सुरुवातीला We the people of India ( आम्ही हिंदुस्थानचे लोक ) हे शब्द आहेत त्या अर्थीं लोकांचा अधिकार गर्भित आहे, गृहीत आहे, असें सांगण्यांत येतें. पण तो गर्भित किंवा गृहीत कां असावा, स्पष्ट कां केलेला नसावा, याचें उत्तर नाहीं. पंडित जवाहरलाल नेहरूंना आपल्या ठरावांत ते शब्द घालण्याची आवश्यकता वाटली त्या अर्थीं त्यांना अर्थ आहे, महत्त्व आहे, हें कोणीहि मान्य करील. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचें उदाहरण हिंदुस्थानच्या उपयोगाचें नाहीं. कारण त्यांची घटना तेरा स्वतंत्र राज्यें एके ठिकाणीं आणण्याकरितां होतीं. शिवाय लोकांच्या स्वयंभू हक्कांची कल्पना फ्रान्सच्या राज्यक्रांतीनंतर रूढ झाली. त्यानंतरच्या स्वतंत्र जनसत्ताक देशांच्या घटनाकायद्यांत लोकांच्या स्वयंभू अधिकाराचा स्पष्ट उल्लेख करण्यांत आलेला आहे. घटनेच्या दुरुस्तीसाठीं व्यवस्था ज्या ३६८ व्या कलमांत केलेली आहे त्यांत सुद्धां लोकांचा उल्लेख नाहीं. ज्या घटनासमितीनें हा घटनाकायदा केला, ती अस्तित्वांत आली ती परकी राज्यकर्त्यांच्या योजनेला धरून आणि तिला सर्वाधिकारित्व मिळालें तेंहि इंग्लंडच्या पार्लमेंटाकडून, या दोन गोष्टी लक्षांत घेतां लोकांच्या स्वयंभू सर्वाधिकारित्वाचा उल्लेख असणें जरूर होतें. इतकेंच नव्हे तर घटनेच्या दुरुस्तीसाठीं लोकांची स्पष्ट अनुमती पाहिजे अशी व्यवस्था हवी होती. केव्हां तरी लोकांचा प्रत्यक्ष संबंध या घटनाकायद्याशीं आल्याशिवाय पुढाऱ्यांना त्याचें पावित्र्य व गांभीर्य पुरेशा प्रमाणांत पटणार नाहीं.

या घटनेसंबंधीं अत्यंत वादग्रस्त प्रश्न म्हणजे तिचें स्वरूप काय आहे याबद्दलचा आहे. हा वाद त्यांतील आर्थिक व्यवस्थेसंबंधीं नसून धार्मिक व्यवस्थेसंबंधीं आहे. भारताचें सरकार (State) आधिभौतिक (Secular) आहे असें पंडित जवाहरलाल वारंवार सांगत असतात. जितक्या हिरीरीनें ते ही भूमिका मांडीत असतात तितक्याच हिरीरीनें त्यांचे विरोधक त्या शब्दाची टर करीत असतात. सेक्युलर या इंग्रजी शब्दाचें मराठींत भाषांतर करणें फार कठीण आहे. निधर्मी, धर्मातीत, धर्मरहित, वगैरे प्रतिशब्द वापरण्यांत येतात. पारलौकिक गोष्टींकडे ही घटना लक्ष देऊं शकत नाहीं, या घटनेखालीं निर्माण झालेलें सरकार पारलौकिक गोष्टींसाठीं कांहीं करूं इच्छिणार नाहीं, इहलोकीं माणसांना सुख लाभावें याकरतांच आपलें सर्व सामर्थ्य सरकार खर्च करील हें सांगण्यासाठीं हा 'सेक्युलर' शब्द पसंत केलेला आहे. धर्माला विरोध करणें, पारलौकिक गोष्टींची अवहेलना करणें, हे हेतु हा शब्द पसंत करण्याच्या मागें मुळींच नाहींत. बुद्धिप्रामाण्यवादी भूमिकेवर आधारलेलें सरकार स्थापन करणारी आपली घटना आहे हें खरें सार आहे.

हा प्रश्न हाताबाहेर झाला म्हणजे घटनेच्या प्रास्ताविक जाहीरनाम्यांत ज्या दोन महत्त्वाच्या घोषणा केलेल्या आहेत, त्यांचा अभ्यास निर्विकार मनानें करतां येईल. पहिली घोषणा म्हणजे 'डेमोक्रॅटिक' या विशेषणाच्या द्वारा केलेली आहे आणि दुसरी घोषणा 'dignity of the individual' (व्यक्तीचा मान किंवा प्रतिष्ठा) या शब्दांच्या द्वारा केलेली आहे. या घोषणा भविष्यकालासंबंधींच्या आहेत असें म्हटलें तरी चालेल. दहाहजारांपैकीं एकापेक्षां अधिक माणसाला या घोषणांची आज जाणीव नाहीं, पण, उद्यां व्हावी असा इरादा आहे. या विषयाबद्दल थोडीशी चर्चा पृ. ८७ वर केलेली सांपडेल. एका पक्षाचें राज्य ही लोकशाही नव्हे, ही स्टालिनशाही आहे, हिटलरशाही आहे, मुसोलिनीशाही आहे. डॉ. आंबेडकरांनीं घटनासमितीच्या शेवटल्या दिवसांत जें भाषण केलें त्यांत लोकशाहीचें रक्षण करण्यासाठीं काय केलें पाहिजे याबद्दल चर्चा केली. त्या वेळीं त्यांनीं सुप्रसिद्ध व्यक्तिस्वातंत्र्यवादी मि. जॉन स्टुअर्ट मिल यांच्या एका धोक्याच्या सूचनेचा उल्लेख केला. मिलला एका व्यक्तीपासून होणारा धोका

दिसत होता, पण, एका पक्षापासून होऊं पहाणाऱ्या धोक्यालाहि ती सूचना तितक्याच प्रमाणांत किंबहुना त्याहून ज्यास्त प्रमाणांत लागू पडेल. आपलें स्वातंत्र्य कोणत्याहि विभूतिपुरुषाच्या पायीं वाहूं नका आणि आपली संघटना उलथून टाकण्याइतक्या प्रमाणांत विनाजबाब अधिकार त्याच्या स्वाधीन करूं नका असा स्पष्ट आदेश मिलनें दिला. हा आदेश हृदयीं बाणला तरच 'डेमोक्रॅटिक रिपब्लिक' हिंदुस्थानांत स्थापन होईल.

वंशपरंपरागत राजा नाहीं तें राज्य 'रिपब्लिक' म्हणून ओळखलें जातें. अशा राज्यांपैकीं ज्या राज्यांत व्यक्तीला समष्टी खाऊन टाकीत नाहीं तीं राज्यें 'डेमोक्रॅटिक रिपब्लिक' या नांवानें ओळखलीं जातात. वर ज्या दोन घोषणांचा निरनिराळा उल्लेख आला आहे त्या खरें पहातां एकाच घोषणेच्या दोन बाजू आहेत. राष्ट्राचें ऐक्य राखावयाचें कारण तें राखलें नाहीं तर हल्लींच्या कालांत व्यक्तीला जगणें शक्य नाहीं. पण राष्ट्राचें ऐक्य हें कांहीं अंतिम ध्येय नाहीं. एका बाजूला विश्वबंधुत्व हें ध्येय आहे आणि दुसऱ्या बाजूला मनुष्यमात्राची किमान प्रतिष्ठा हें ध्येय आहे. हीं दोनहि ध्येयें साधण्याचें साधन म्हणून राष्ट्राच्या ऐक्याचें खरें महत्त्व आहे. भारताच्या राज्यघटनेंत ५१ व्या कलमांत विश्वबंधुत्वाचें ध्येय सूचित केलेलें आहे. ( पहा पृ. २८ ). उलटपक्षीं संयुक्त राष्ट्रसंघानें वैयक्तिक हक्कांची सनद मंजूर केली आहे व तिला भारताच्या प्रतिनिधींनीं संमति दिली आहे. या गोष्टींचा विचार करतां लोकशाही प्रस्थापित करावयाची म्हणजे व्यक्तीचें महत्त्व किती आहे आणि सरकारचें स्थैर्य तारतम्यानें किती महत्त्वाचें आहे हें समजेल. 'हिंदुधर्म धोक्यांत आहे' किंवा 'इस्लाम खत्रेमें' या घोषणांनीं ज्याप्रमाणें हजारों व्यक्तींचे रक्त सांडतें त्याचप्रमाणें राष्ट्र धोक्यांत आहे या घोषणेनें अनेक व्यक्तींची मानहानि आणि नुकसानी होते. लोकशाही ही सुखासीनांची नाहीं, सुखासीनांकरितां नाहीं. 'डिमॉक्रसी फर्स्ट' प्रथम लोकशाही असें जे म्हणावयास तयार असतील आणि तदनुसार झीज सोसावयास तयार असतील त्यांच्याकरतां लोकशाही आहे. तशी हिंदुस्थानांतील बहुसंख्येची इच्छा आणि तयारी नसेल तर जितक्या लवकर स्टालिनशाही येईल तितकी बरी. उगीच लोकांचा कोरिया तरी होणार नाहीं. एका पक्षाच्या हातांत

फार दिवस सत्ता राहिली कीं व्यक्तिस्वातंत्र्याची, व्यक्तींच्या मानाची, व्यक्तीच्या प्रतिष्ठेची, गळचेपी झालीच म्हणून समजा. मग पुराणांतलीं वांगी पुराणांतच रहातील. मग विचारस्वातंत्र्य सुद्धां कागदावरच राहील. आजपर्यंत जी प्रगति झाली आहे तिचा जनक असंतोष आहे. एका पक्षाच्या हातांत सत्ता फार दिवस राहिली म्हणजे असंतोषाला ठेचून टाकण्याचीच व्यवस्था होणार.

साकल्यानें पहातां स्वतंत्र भारताच्या घटनेचा कायदा ( कलम ३६८ वजा करतां ) ठीक आहे. डॉ. आंबेडकरांना या स्मृतीचे मुख्य ऋषि म्हणतात त्यांनीं या म्हणजे ३६८ व्या कलमाची जोरदार तरफदारी केली आहे. घटनेबद्दल बोलतांना ते म्हणाले कीं घटना कितीहि चांगली व निर्दोष असली तरी ती अंमलांत आणणारे जर नालायक व निरुपयोगी असतील तर ती सदोष ठरेल, उलटपक्षीं घटना कितीहि वाईट असली तरी ती राबवणारे चांगले असतील तर ती चांगली ठरेल. या दोनहि मुद्यांवर डॉ. आंबेडकरांनीं प्रकट केलेलें मत अग्राह्य आहे. घटना जर चांगली असली काय आणि वाईट असली काय सारखीच तर चौसष्ट लक्ष रुपयांचा चुराडा कशासाठीं केला? त्यापेक्षां तेवढ्या किंमतीचा कागद प्राथमिक पुस्तकें छापावयास कां नाहीं दिला? डॉ. आंबेडकरांना घटना राबवणारांपलीकडे कोणी आहेत असें वाटतच नाहींसें दिसतें. घटना लोकांकरतां आहे, लोकांची आहे, त्यांत लोकांना स्वयंनिर्णयाचा हक्क आहे, तिजसंबंधीं लोकांनीं करण्याजोगें कांहीं आहे, वाईट प्रतिनिधींच्या जागीं चांगले प्रतिनिधि निवडणें हें लोकांना शक्य आहे व लोकांचें कर्तव्य आहे—या गोष्टी ते विसरलेच आहेत. या गोष्टी ते विसरले आहेत म्हणूनच ३६८ व्या कलमाची ते हिरीरीनें तरफदारी करीत आहेत, म्हणूनच कलम १४ व कलम ४४ यांतील शब्द व अर्थ यांना पुराणांतल्या वांग्याप्रमाणें पुराणांतच ठेवून हिंदुकोडबिलाचा हिरीरीनें आणि असहिष्णुतेनें पुरस्कार करीत आहेत. लोकशाहीच्या यशासाठीं लोकांचें सामर्थ्य वाढविलें पाहिजे, लोकांवर जबाबदारी टाकली पाहिजे, लोकांना हक्कांची जाणीव दिली पाहिजे. सरकारवर विश्वास ठेवा, सरकारचे हात मजबूत करा, सरकारशीं सहकार्य करा, हा उपदेश वेळीं अवेळीं करून लोकांमध्यें सामर्थ्य निर्माण व्हावयाचें नाहीं. स्वतांवर विश्वास ठेवा, तुम्ही मालक आहां, तुम्ही आमच्याइतकेच शहाणे आहां,

तुमच्यापैकीं कोणीहि मंत्री होऊं शकेल, आम्हाला प्रश्न विचारण्याचें तुमचें कर्तव्य आहे, मंत्र्यांना उठल्यासुटल्या अनावरणसमारंभांना बोलवूं नका, मंत्र्यांना मेजवान्या देऊन पैसा खर्च करूं नका, असा उपदेश आजच्या मंत्र्यांनीं लोकांना केला तर लोकांत सामर्थ्य निर्माण होईल. लोकांत सामर्थ्य निर्माण झालें तर लोकशाही प्रस्थापित करावयास लागणारी व्यवस्था भारतीय घटनाकायद्यांत आहे.

ही भारतीय राज्यघटना भारतांतील अखिल जनतेला मान्य झाली पाहिजे, ती एका पक्षानें मान्य करावयाची नियमावलि नव्हे. इंग्लंडमध्यें पार्लमेंटबद्दल जी सर्वसाधारण नागरिकाची भावना ती भारतांतील नागरिकाची या घटनेबद्दल झाली पाहिजे. ही गंभीर आणि पवित्र स्मृति आहे. या स्मृतीचें गांभीर्य आणि पावित्र्य जनतेला पटावें अशी तिच्या कर्त्यांची इच्छा असेल तर तें प्रथम त्यांनीं जतन केलें पाहिजे. त्या स्मृतींतील एखाद्या सूत्राचा अर्थ गैरसोईचा लागल्याबरोबर जर या मंत्रपाठकांनींच हाकाटी करावयास सुरुवात केली, किंवा, तें सूत्रच बदलून टाका असें पुढाऱ्यांनीं म्हणावयास सुरुवात केली, तर लोकांना या घटनास्मृतीचें गांभीर्य किंवा पावित्र्य कसें वाटेल किंवा पटेल? पोलीस कमिशनरच्या एखाद्या हुकमापलीकडे किंवा कायदेमंडळानें केलेल्या एकाद्या कायद्यापलीकडे या घटनाकायद्यांत पवित्र किंवा गंभीर असें कांहीं आहे हा विचार साधारण नागरिकाच्या मनांत कां यावा? जबाबदारीचें तत्त्व घटनाकायद्यांत घालून काय उपयोग? ज्या देशाच्या घटनेच्या कायद्यांत तें नाहीं तेथेंच तें यशस्वी झालें आहे. आजच्या पुढाऱ्यांनीं स्वतांला संयम शिकविला, लोकांना असंतोषाचा व सामर्थ्याचा उपदेश केला, आणि ज्ञानप्रसारासाठीं पुरेसा कागद सरकारनें लोकांना उपलब्ध केला, तर भारतांत व्यक्तीचा मान, राष्ट्राचें ऐक्य आणि लोकशाही या 'त्रिमूर्तींची व्यवस्थित प्रतिष्ठापना होऊं शकेल अशी व्यवस्था राज्यघटनेच्या कायद्यांत आहे.



**We, the people of India,** having solemnly resolved to constitute India into a SOVEREIGN DEMOCRATIC REPUBLIC and to secure to all its citizens:

**Justice,** social, economic and political;

**Liberty** of thought, expression, belief, faith and worship;

**Equality** of status and of opportunity; and to promote among them all

**Fraternity** assuring the dignity of the individual and the unity of the Nation;

**In our Constituent Assembly** this twentysixth day of November, 1949, do **hereby adopt, enact and give to ourselves this constitution.**

आम्ही, भारतांतील लोक, या देशांत सर्वाधिकारी लोकसत्ताक जनराज्य स्थापन करण्याचें आणि भारताच्या सर्व नागरिकांना

सामाजिक, आर्थिक व राजकीय न्याय

विचार, उच्चार, मत, श्रद्धा आणि भजनपूजन यांचें स्वातंत्र्य

दर्जा व संधि यांसंबंधींची समता

यांची निश्चित प्राप्ति करून देण्याचें, तसेंच

व्यक्तीचा मान व राष्ट्राचें ऐक्य या दोहोंची निश्चित निर्मिती

करणारा बंधुभाव सर्व नागरिकांमध्यें वाढीस लावावयाचें ठरवून,

आमच्या या घटनासमितीच्या द्वारा सन १९४९ सालीं नोव्हेंबरच्या २६ व्या दिवशीं ही राज्यघटना पसंत करून तिला कायद्याचें स्वरूप देत आहों आणि ती आम्हाला स्वतांला अर्पण करीत आहों.

## भाग पहिला

# संघ व त्याचें क्षेत्र

घटनाकायद्याच्या पहिल्या भागांत चार कलमें असून या देशाचें नांव, व क्षेत्र आणि तत्सम विषयांचा परामर्श घेतलेला आहे. पहिल्या कलमांत या देशाचें नांव इंडिया किंवा 'भारत' आहे असें सांगून, हा अनेक राज्यांचा संघ आहे असें फर्मावलें आहे.

घटक राज्यांचे चार गट अगर वर्ग केलेले आहेत. १९४७ पूर्वी ज्या भागांना गव्हर्नरांचे प्रांत म्हणण्यांत येत असे त्यांना 'अ' वर्गाचीं राज्यें म्हणण्यांत आलें आहे. ज्यांना देशी संस्थानें म्हणत त्यांना 'ब' वर्गाचीं राज्यें, ज्यांना 'चीफ कमिशनरांचे प्रांत' म्हणत त्यांना 'क' वर्गाचीं राज्यें आणि अंदमान व निकोबार बेटांना 'ड' वर्गाचीं राज्यें म्हणण्यांत आलें आहे. कांहीं देशी संस्थानांना 'क' वर्गात घालण्यांत आलें आहे. बाकीचीं जीं देशीं संस्थानें होतीं त्यांतलीं फारच थोडीं होतीं तशीं आहेत, बाकीच्या संस्थानांचे गट बनविण्यांत आले आहेत. १९४७ च्या पंधरा ऑगष्टपर्यंत हिंदुस्थानांत समाविष्ट असलेले कांहीं गव्हर्नरांचे प्रांत, कांहीं चीफ कमिशनरांचे प्रांत आणि कांहीं देशी संस्थानें यांचा मिळून पाकिस्तान हा अलग देश स्थापन करण्यांत आला आहे हें आतां सर्वांना माहीत आहे. या चार वर्गांतील राज्यांचीं नांवें पहिल्या परिशिष्टांत दिलेलीं आहेत. वाचकांच्या माहितीकरतां त्यांचीं नांवें येथें दिलीं आहेत.

### अ वर्ग

(१) आसाम (२) बिहार (३) मुंबई (४) मध्यप्रदेश म्हणजेच मध्यप्रांत (५) मद्रास (६) ओरिसा (७) पंजाब (८) उत्तर प्रदेश म्हणजेच संयुक्तप्रांत (९) पश्चिम बंगाल.

## ब वर्ग

( १ ) हैद्राबाद ( २ ) काश्मीर ( ३ ) मध्यभारत ( ४ ) म्हैसूर ( ५ ) पत्याळा व पूर्वपंजाब संस्थान संघ ( ६ ) राजस्थान म्हणजेच राजपुताना ( ७ ) सौराष्ट्र म्हणजेच काठेवाड ( ८ ) त्रावणकोर-कोचीन.

## क वर्ग

( १ ) अजमीर ( २ ) भोपाळ ( ३ ) बिलासपूर ( ४ ) कुचबिहार ( ५ ) कुर्ग ( ६ ) दिल्ली ( ७ ) हिमाचल प्रदेश ( ८ ) कच्छ ( ९ ) मणिपूर ( १० ) त्रिपुरा ( ११ ) विंध्यप्रदेश.

यांपैकीं कुचबिहार संस्थान बंगालच्या गव्हर्नरच्या ताब्यांत देण्यांत आलें आहे. त्या संस्थानचे तुकडे करण्यांत येणार नाहींत एवढी हमी घेऊन ही व्यवस्था केलेली आहे.

## ड वर्ग

अंदमान व निकोबार बेटें. याशिवाय जे प्रदेश संपादन केले जातील त्यांचा समावेश 'भारत' मध्यें करण्यांत येईल.

दुसऱ्या, तिसऱ्या आणि चौथ्या कलमांनीं भारताच्या पार्लमेंटास भारताच्या क्षेत्रासंबंधी कांहीं अधिकार दिले आहेत. पार्लमेंटानें कायदा करून योग्य अटींवर व शर्तींवर नवीं राज्यें संघांत सामील करून घ्यावीं अगर स्थापन करावीं. तिसऱ्या कलमांत पार्लमेंटास परिशिष्टांत दिलेल्या रचनेंत बदल करण्याचा अधिकार दिलेला आहे. एकाद्या राज्याचा कांहीं भाग तोडून, किंवा अनेक राज्यें एकमेकांशीं संलग्न करून, किंवा अनेक राज्यांचे कांहीं भाग एकमेकांशीं जोडून किंवा एकाद्या राज्याला शेजारच्या राज्याचा कांहीं भाग जोडून, नवें राज्य बनवण्याचा पार्लमेंटास अधिकार आहे. भाषावार प्रांतरचनेची मागणी महशूर आहे. त्याप्रमाणें जर पुनः घटकांची रचना करावयाची झाली तर घटनेची दुरुस्ती करण्याचें कारण नसावें हा या कलमाचा मुख्य हेतु आहे. एकाद्या राज्याचें क्षेत्र वाढविणें, एकाद्या राज्याच्या चतुःसीमा बदलणें, एकाद्या राज्याचें नांव बदलणें, याहि पार्लमेंटाच्या अखत्यारांतील गोष्टी आहेत.

## भाग दुसरा

# नागरिकत्व

दुसऱ्या भागाचें शीर्षक 'नागरिकत्व' हें असून त्यांत पांच ते अकरा कलमांचा समावेश आहे.

घटनाकायद्यानें दिलेले सर्व हक्क भारताच्या नागरिकांना दिलेले आहेत. पार्लमेंट व राज्याचीं कायदेमंडळें निवडण्याचा हक्कहि नागरिकांचा आहे. घटनाकायद्याच्या प्रस्तावनेंत मात्र नागरिक हा शब्द नसून ( पीपल ) लोक हा शब्द आहे हें ध्यानांत ठेवावें.

जगांत जे सर्वमान्य असे नियम आहेत त्यांत कोणीहि एकापेक्षां अधिक राष्ट्रांचा नागरिक होऊं शकत नाहीं हा एक नियम आहे. या नियमामुळें ज्यावेळीं हिंदुस्थाननें 'रिपब्लिक' होण्याचा निर्णय घेतला त्याच वेळीं इंग्लंडच्या पार्लमेंटानें खास कायदा करून हिंदी नागरिकांचे कांहीं हक्क इंग्लंडमध्यें चालू ठेवले. या नियमामुळेंच भारताचा नागरिक कोण यासंबंधीं कलमें घटनाकायद्यांत घालावीं लागलीं.

ता. २६ जानेवारी १९५० रोजीं किंवा तत्पूर्वी ज्याचें भारतांत वास्तव्य असेल आणि जो या देशांत जन्मला असेल किंवा ज्याची आई वा बाप भारतांत जन्मलेला असेल, किंवा या तारखेच्या पूर्वी निदान पांच वर्षे जो भारत भूमींतील रहिवाशी असेल, तो भारताचा नागरिक होय. १९४७ सालीं झालेल्या फाळणीनें ज्या गुंतागुंती निर्माण झाल्या त्यांपैकीं कांहींमधून मार्ग काढण्याकरतां कलम सहामध्यें खास व्यवस्था केलेली आहे. जे लोक अखंड हिंदुस्थानचे नागरिक होते पण फाळणीमुळें पाकिस्तान या परक्या देशाचे नागरिक ज्यांना व्हावें लागलें असे लाखों लोक भारतांत येऊन राहिले. असे लोक हिंदुस्थानांत म्हणजे भारतांत राहण्याकरतां आलेले असतील तर त्यांना भारताचे नागरिक मानण्यांत यावें अशी योजना केलेली आहे. तसेंच कांहीं लोक उदरभरणार्थ अन्य देशांत जाऊन राहिले, त्यांच्या एक दोन

पिढ्याहि तिकडे झाल्या पण त्या देशाचें नागरिकत्व त्यांना मिळालें नाहीं अशा लोकांना कांहीं शर्तींवर भारताचे नागरिक मानण्यांत येईल.

नवव्या कलमांत असें फर्मावलें आहे कीं ज्या कोणी दुसऱ्या राष्ट्राचें नागरिकत्व स्वीकारलें असेल त्याला भारताचा नागरिक होतां येणार नाहीं.

पांच, सहा, सात व आठ या कलमान्वयें जो भारताचा नागरिक असेल त्याचें नागरिकत्व चालू राहील, मात्र यासंबंधीं पार्लमेंटनें केलेले कायदे त्याला बंधनकारक होतील.

नागरिकत्व मिळविणें, नागरिकत्व नष्ट होणें आणि नागरिकत्वासंबंधीं इतर बाबी, यासंबंधीं कायदे करण्याचा अधिकार पार्लमेंटास दिलेला आहे.

घटकांच्या कायदेमंडळांना नागरिकत्वासंबंधीं कोणताहि कायदा करण्याचा अधिकार नाहीं. भारताच्या नागरिकांचे जे मूलभूत हक्क आहेत त्यांत भारताच्या सर्व भागांत हिंडण्याचा आणि कोणत्याहि भागांत वस्ती करण्याचा हक्क आहे. या हक्कावर घटक सरकारें निर्बंध घालूं शकत नाहींत. जगाच्या दृष्टीनें भारत हा एक ( अखंड ) देश आहे हें सिद्ध करण्यासाठीं अशी व्यवस्था केलेली आहे.

---

# भाग तिसरा

# मूलभूत हक्क

भारताच्या राज्यघटनेचा कायदा घटनासमितीनें पास केला त्याच्यापूर्वी म्हणजे समितीच्या सुरवातीच्या अधिवेशनांत एक उद्दिष्टाचा ठराव ( ऑबजेक्टिव्हज रेझोल्यूशन ) पास झाला होता तो ठराव घटनासमितीनें नेमलेल्या सर्व पोटकमिट्यांना बंधनकारक होता. जी मसुदासमिती घटनासमितीनें नेमली तिला त्या ठरावाचा अंतर्भाव जेणेंकरून घटनेच्या मसुद्यांत होईल असाच मसुदा तयार करणें भाग होतें. मसुद्याच्या सुरवातीला जाहीरनामावजा प्रास्ताविक भाग तयार करावा लागला, त्याला इंग्रजींत प्रिॲम्बल् म्हणतात. या भागांत उद्दिष्टांच्या ठरावाचें सार आलेलें आहे. लोकशाहीच्या तत्त्वानुसार ज्याचा राज्यकारभार चालेल असें प्रजासत्ताक राज्य स्थापन करणें हें प्रमुख उद्दिष्ट आहे आणि याच्याच बरोबर सर्व नागरिकांना न्याय, स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव यांचा लाभ झाला पाहिजे हें उद्दिष्ट आहे.

आपल्या देशाचें दुर्दैव हें आहे कीं प्राणाच्या खालोखाल महत्त्वाची अशी जी आपली राज्यघटना तिचा मसुदा परकीय भाषेंत करावा लागला. तो तयार करणारे लोक वेदाभ्यासजड तर होतेच, पण त्यांनीं वेदाभ्यास केला तो परकी भाषेंत, म्हणजे इंग्रजी भाषेंत. हा जो प्रास्ताविक भाग तयार करण्यांत आला आहे तो सुद्धां सरळ किंवा एकरंगी नाहीं. एकादा बोजा उचलून टाकावा तसा हा मसुदा तयार केलेला आहे. पुष्कळ ठिकाणच्या चांगल्या चांगल्या गोष्टी एके ठिकाणीं आणण्याचा यांत प्रयत्न केलेला आहे. अकबर बादशहानें असा एक धर्म निर्माण करण्याचा प्रयत्न केला होता. त्या ऐतिहासिक घटनेची आठवण या प्रास्ताविक भागावरून होते. फ्रान्सची राज्यघटना बनवितांना 'स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव' (लिबर्टि, इक्वॉलटी ॲण्ड फ्रॅटर्निटी) या तीन शब्दांत सर्व उच्चतम कल्पनांचा समावेश होतो अशी भावना होती. अमेरिकन राज्यघटनेच्या प्रास्ताविक भागांत 'न्याय' प्रस्थापित करणें हें एक उद्दिष्ट म्हणून समाविष्ट केलेलें आहे. आपल्या

विद्वद्वर्यांनीं या चारहि शब्दांचा समावेश करून भारताच्या घटनेचा प्रास्ताविक भाग बनविला आहे. इंग्लंडच्या राज्यघटनेंत असलें शब्दांचें अवडंबर मुळींच नाहीं. 'न्याय, स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव' यांचा लाभ सर्व नागरिकांना झाला पाहिजे असा जाहीरनामा प्रसिद्ध केल्यावर तो लाभ कसा होईल याबद्दल तरतूद करणें भाग पडलें.

ही जी तरतूद केलेली आहे ती तिसऱ्या आणि चौथ्या भागांत आहे. तिसऱ्या भागांत कलमें १२ ते ३५ यांचा समावेश आहे आणि चौथ्या भागांत कलमें ३६ ते ५१ यांचा समावेश आहे. तिसऱ्या भागाचें शीर्षक 'मूलभूत हक्क' हें असून चौथ्या भागाचें शीर्षक 'मार्गदर्शक तत्त्वें' हें आहे. या कलमांबद्दल नेहमीं ज्यास्तींत ज्यास्त चर्चा होत असते. लोकशाहीबद्दलच्या हल्लींच्या कल्पना अनेक आहेत. पण सर्व कल्पनांच्या मुळाशीं लोकांचा स्वयंभू हक्क असतो. खरें पाहिलें तर 'प्रजा' हा शब्दसुद्धां या स्वयंभू हक्कासंबंधींच्या कल्पनेशीं विसंगत आहे. राजा शद्बाचा पूरक शब्द 'प्रजा' आहे. पण 'राजा' काढून टाकल्यावर 'प्रजा' कोठून आली ? असें आहे तरी रिपब्लिक या शब्दाचें भाषांतर 'प्रजा-सत्ताक' याच शब्दानें करण्याची प्रथा पडली आहे व मान्य झाली आहे. मान्यवर विद्वद्वर्यांनीं एखादी प्रथा पाडली अगर मान्य केली म्हणजे तिच्या विरुद्ध बंडाचें निशाण उभारण्यांत अर्थ नसतो आणि लोकांना आपला स्वयंभू हक्क टाकून या प्रथेचा स्वीकार करावा लागतो.

अनेक कल्पना आणि उच्च विचार हवेंत वावरत असतात. दुनियेला झुकवण्याचें सामर्थ्य ज्यांच्या वाणींत किंवा लेखणींत असतें ते या कल्पनांचें व उच्च विचारांचें भांडवल वापरीत असतात. मूलभूत हक्क आणि मार्गदर्शक तत्त्वें हीं तरी घटना कायद्याच्या मसुद्यांत कां गोवावीं लागलीं ? 'वेलफेअर स्टेट' आणि 'कोऑपरेटिव्ह कॉमनवेल्थ' या दोन कल्पना लोकांच्या डोळ्यांपुढें पुढाऱ्यांनीं झुलत ठेविलेल्या होत्या. अलीकडे 'सेक्युलर स्टेट' हीहि कल्पना लोकांच्या डोळ्यांपुढें झुलत ठेवलेली आहे. या तीनहि कल्पनांचा उल्लेख प्रास्ताविक भागांत कां नाहीं हें सांगणें कठीण आहे. केव्हांतरी कोणीतरी या प्रश्नांचें उत्तर कदाचित् देईलहि. या तीन कल्पनांना मूर्त स्वरूप देण्यासाठीं तिस[illegible] णि चौथ्या [illegible]गांत घटना बनविणारांनीं योजना केलेली आहे. या

योजनेचे दोन भाग करण्याचा हेतु असा कीं कांहीं हक्क कोर्टामार्फत बजावून घेतां येण्याजोगे आहेत, त्यांचा समावेश तिसऱ्या भागांत आहे; आणि कांहीं तत्त्वें अधिकाऱ्यांनीं अंमलांत आणावयाचीं आहेत पण तीं केव्हां व कशीं अंमलांत आणावयाचीं हें ठरविण्याचें काम त्यांच्यांवरच सोंपविण्यांत आलें आहे, अशा तत्त्वांचा समावेश चौथ्या भागांत केलेला आहे.

मूलभूत हक्कांची अंमलबजावणी कोर्टामार्फत करून घेतां येईल हें वर सांगितलेलें आहे. असें असण्याचें कारण लोक म्हणजेच नागरिक यांचें स्वयंभू आणि सार्वभौम महत्त्व. कायदेमंडळें काय किंवा सरकार काय हीं स्वयंभू नसून लोकांचे सेवक आहेत. लोकांच्या सामुदायिक इच्छेनुसार त्यांना जे अधिकार प्राप्त झालेले असतात ते लोकांच्या सेवेकरतां होय. म्हणूनच कायदेमंडळांनीं व सरकारनें कोणते नियम पाळले पाहिजेत हें घटना कायद्यांत नमूद करावें लागतें. लोकांचे मूलभूत हक्क घटनेच्या कायद्यांत नमूद केले म्हणजे त्यांना बाधा न आणतां राज्यकारभार सरकारन चालविला पाहिजे हें क्रमप्राप्त होतें. या नियमाबद्दल शंका राहूं नये म्हणून कलम तेरामध्यें असें जाहीर केलें आहे कीं 'या घटनेचा अंमल सुरू होण्यापूर्वीं भारत देशांत अंमलांत असणाऱ्या कायद्यांपैकीं जे कायदे या मूलभूत हक्कांशीं विसंगत असतील ते रद्द समजले जातील आणि त्यांचा अंमल करतां येणार नाहीं. तसेंच यापुढें या मूलभूत हक्कांना कोणत्याहि प्रकारची बाधा आणणारा कायदा कायदे–मंडळें करूं शकणार नाहींत आणि कदाचित् तसला एकादा कायदा करण्यांत आला तर त्याचा अंमल करतां येणार नाहीं.' अशा या मूलभूत हक्कांची यादी यापुढें देण्यांत येत आहे.

## मूलभूत हक्कांची यादी

(१) कायद्याच्या क्षेत्रांत सर्वांना समता मिळाली पाहिजे आणि कायद्यानें सर्वांचें सारखें संरक्षण केलें पाहिजे.

(२) धर्म, वंश, जात, लिंग, जन्मस्थान यांपैकीं कोणत्याहि कारणानें किंवा कारणांनीं पक्षपात किंवा भेदाभेद निर्माण होतां कामा नये. दुकानें, खाणावळी, करमणुकीचीं स्थळें, विहिरी, तळीं, नदीचे घाट, रस्ते आणि इतर सार्वजनिक जागा यांचा उपभोग सर्व नागरिकांना सारखा मिळाला पाहिजे.

(३) सरकारी नोकरी मिळण्याचे बाबतींत सर्वांना सारखी संधि मिळाली पाहिजे.

(४) अस्पृश्यता नष्ट झाली आहे आणि कोणत्याहि स्वरूपाची अस्पृश्यता पाळण्यास मनाई करण्यांत आली आहे. अस्पृश्यतेच्या रूढीपासून निर्माण झालेल्या कोणत्याहि नालायकीचा अंमल करणें हा गुन्हा ठरवण्यांत येत आहे.

(५) भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, शस्त्राशिवाय व शांतपणें जमण्याचें स्वातंत्र्य, संघ स्थापन करणें, भारताच्या कोणत्याहि भागांत राहणें, मालमत्ता मिळविणें, धारण करणें व विकणें किंवा देणें, कोणताहि धंदा पत्करणें, कसलाहि व्यापार करणें, हे हक्क सर्व नागरिकांना उपभोगतां आले पाहिजेत.

(६) कोणतेंहि कृत्य ज्या वेळीं तें घडलें त्या वेळीं अमलांत असलेल्या कायद्यान्वयें शिक्षेस पात्र असलें तरच तें कृत्य करणारा शिक्षेला पात्र होईल. आणि त्या कायद्याखालीं जी शिक्षा फर्माविलेली असेल तिजपेक्षां ज्यास्त शिक्षा देतां येणार नाहीं.

(७) कोणत्याहि दोषार्ह कृत्याबद्दल एकापेक्षां अधिक वेळां कोणाहि व्यक्तीवर खटला भरतां येणार नाहीं व कोणाहि व्यक्तीला शिक्षा करतां येणार नाहीं.

(८) कोणाहि आरोपीला स्वतःविरुद्ध साक्ष द्यावयास भाग पाडतां येणार नाहीं.

(९) कोणाच्याहि जीवितावर अगर शारीरिक स्वातंत्र्यावर कायदेशीर मार्गाशिवाय अन्यमार्गानें घाला घालतां यावयाचा नाहीं.

(१०) जर कोणालाहि पकडण्यांत आलें तर त्याच्यावर कोणता आरोप ठेवण्यांत यावयाचा आहे हें त्याला कळविलेंच पाहिजे आणि त्याला आपल्या वकिलाचा सल्ला घ्यावयास मिळाला पाहिजे. तसेंच वकिलामार्फत बचाव करून घेण्याचाहि दरएकाचा हक्क आहे. ज्या कोणाला पकडण्यांत आलें असेल त्याला चोवीस तासांच्या आंत मॅजिस्ट्रेटपुढें उभें करण्यांत आलें पाहिजे.' या हक्काला कांहीं अपवाद आहेत. सार्वजनिक शांतता व देशाची सुरक्षितता यांच्या रक्षणासाठीं जी अटक करण्यांत येईल तिजसंबंधीं अपवादात्मक व्यवस्था केलेली आहे. परदेशच्या माणसाला या हक्काचा फायदा मिळणार नाहीं.

( ११ ) वेठ आणि माणसाचा क्रय–विक्रय यांना बंदी आहे.

( १२ ) चौदा वर्षांच्या आंतील मुलांस कारखान्यांत, खाणींत किंवा कोणत्याहि धोक्यानें भरलेल्या कामासाठीं नोकरीस ठेवतां कामा नये.

( १३ ) दर एकाला धार्मिक स्वातंत्र्य आहे. धर्माचा प्रचार करण्याचा समावेश या स्वातंत्र्यांत होतो. धार्मिक संस्था स्थापन करून त्या चालविणें, त्यांसाठीं द्रव्य अगर जमीन जुमला मिळविणें व त्यांचा उपयोग करणें हेहि दर एक नागरिकाचे हक्क आहेत.

( १४ ) कोणत्याहि विशिष्ट धर्माच्या प्रसारासाठीं अगर रक्षणासाठीं कोणालाहि कर द्यावयाची सक्ति करतां येणार नाहीं.

( १५ ) कोणत्याहि सरकारी शिक्षणसंस्थेंत धार्मिक शिक्षण देतां येणार नाहीं. सरकारी ग्रँट घेणाऱ्या कोणत्याहि शिक्षणसंस्थेंत धार्मिक शिक्षणाची सक्ती करतां येणार नाहीं.

( १६ ) भाषा, लिपी आणि संस्कृति यांचें रक्षण करण्याचा दर एक समाजाला हक्क आहे.

( १७ ) धर्माच्या अगर भाषेच्या दृष्टीनें अल्पसंख्याक असणाऱ्या समाजांना स्वतांच्या शिक्षणसंस्था स्थापन करण्याचा हक्क आहे, आणि त्या संस्थांना इतर शिक्षणसंस्थांइतक्या प्रमाणांत सरकारी मदत मिळाली पाहिजे.

( १८ ) कोणाचीहि मत्ता कायदेशीर मार्गाशिवाय अन्यमार्गानें ( म्हणजे केवळ सत्तेच्या जोरावर ) त्याच्यापासून हिरावून घेतां येणार नाहीं.

( १९ ) मूलभूत हक्कांची अंमलबजावणी करण्यासाठीं ( वरिष्ठ ) सुप्रीम कोर्टाकडे अर्ज करण्याचा दर एकास हक्क आहे.

( २० ) लष्करी अगर विद्वत्तानिदर्शक पदव्यांव्यतिरिक्त कोणतीहि पदवी कोणालाहि देण्याचा सरकारला अधिकार नाहीं. भारताच्या कोणत्याहि नागरिकाला परराज्यानें दिलेली पदवी स्वीकारितां येणार नाहीं. [ परदेशांतील विद्यापीठांनीं किंवा तत्सम बिनसरकारी संस्थांनीं दिलेल्या पदव्यांना हा निर्बंध लागू आहे असें कोणी समजूं नये. ]

---

# भाग चवथा

# मार्गदर्शक तत्त्वें

सरकारनें राज्यकारभार चालवितांना आणि कायदेमंडळांनीं कायदे करतांना आपल्या नजरेपुढें ठेवावयाचीं तत्त्वें चवथ्या भागांत समाविष्ट केलेलीं आहेत हें वर सांगितलेलें आहे. प्रजाहितसंरक्षक ( वेल्फेअर स्टेट ) राज्य या नांवाला भारताचें राज्य लायक ठरावें याकरतां हीं तत्त्वें कल्पिलेलीं आहेत. त्या मार्गदर्शक तत्त्वांची यादी यापुढें दिलेली आहे.

( १ ) सामाजिक, आर्थिक आणि न्यायाच्या पायावर उभारलेली समाज-व्यवस्था स्थापन करून लोकांचें हितसंवर्धन करणें हें सरकारचें कर्तव्य आहे.

( २ ) दर एक स्त्रीपुरुषाला उपजीविकेचीं पुरेशीं साधनें मिळालीं पाहिजेत.

( ३ ) राष्ट्राच्या संपत्तीची मालकी व व्यवस्था सर्वांचें जास्तींत जास्त हित होईल अशा तऱ्हेनें विभागली पाहिजे.

( ४ ) थोड्याशा लोकांच्या हातांत उत्पादनांचीं साधनें गेल्यामुळें बहुजन समाजाची हानि होते म्हणून तसें न होईल अशी आर्थिक व्यवस्था झाली पाहिजे.

( ५ ) स्त्री व पुरुष यांना सारख्या कामाबद्दल सारखाच पगार मिळाला पाहिजे.

( ६ ) कामकरी स्त्रीपुरुषांच्या शक्तीचा आणि मुलांच्या अल्पवयाचा दुरुपयोग होऊं देतां कामा नये, व आर्थिक अडचणीपायीं शक्तीच्या दृष्टया किंवा वयाच्या दृष्टया न झेपणाऱ्या कामाचा बोजा कोणालाहि घ्यावा लागतां कामा नये.

( ७ ) मुलें व तरुण स्त्री-पुरुष यांची पिळणूक होतां कामा नये, 'आणि त्यांची नैतिक वा आर्थिक उपेक्षा होतां कामा नये.

( ८ ) ग्रामपंचायतींची स्थापना करून त्यांना लोकशाहीचीं केंद्रें बनावयास समर्थ केलें पाहिजे.

( ९ ) दर एकाला शिक्षण व काम मिळेल आणि बेकारी, म्हातारपण, आजार किंवा पंगूपणा यांपैकीं कशानेंहि पीडिलेल्याला अन्नवस्त्र मिळेल अशी व्यवस्था झाली पाहिजे.

( १० ) काम करणारांना न्याय व माणुसकी यांचा लाभ झाला पाहिजे आणि स्त्री कामगारांना बाळंतपणाच्या कालांत मदत मिळाली पाहिजे.

( ११ ) सर्व नागरिकांना सारखा लागू पडेल असा विवाह, वारसा, मृत्यु-पत्रें, देवघेव वगैरे संबंधींचा कायदा करण्याचा सरकारनें प्रयत्न केला पाहिजे.

( १२ ) चौदा वर्षाचें वय होईपर्यंत दर एकाला मोफत व सक्तीचें शिक्षण मिळेल अशी व्यवस्था दहा वर्षाच्या आंत झाली पाहिजे.

( १३ ) देशांतील कमी समर्थ समाजाचें शैक्षणिक व आर्थिक कल्याण करण्यासाठीं सरकारनें झटलें पाहिजे; विशेषेंकरून हरिजन आणि आदिवासी यांना अन्याय व पिळणूक यांपासून सरकारनें बचावलें पाहिजे.

( १४ ) आहाराच्या पौष्टिकतेचें मान वाढविणें, लोकांच्या राहणीचें मान सुधारणें आणि सार्वजनिक आरोग्य राखणें, हीं सरकारनें आपलीं प्राथमिक कर्तव्यें मानिलीं पाहिजेत. विशेषेंकरून आरोग्यहानिकारक असणारीं मादक पेयें व अमली पदार्थ यांचें सेवन करावयास बंदी करण्याचा प्रयत्न सरकारनें केला पाहिजे. याला अपवाद म्हणून आजाराच्या वेळीं वैद्याच्या किंवा डॉक्टरच्या सांगण्याप्रमाणें यांचा उपयोग करावयास परवानगी ठेवावी.

( १५ ) शेतीसुधारणा आधुनिक व शास्त्रीय पद्धतीनें करण्याचा आणि दूध देणाऱ्या जनावरांची पैदास सुधारण्याचा प्रयत्न सरकारनें केला पाहिजे. तसेंच गाई, वासरें आणि इतर दूध देणारीं व शेतीच्या कामीं लागणारीं जनावरें यांच्या कत्तलीला मनाई करण्याचा प्रयत्न सरकारनें केला पाहिजे.

( १६ ) न्यायखातें आणि अंमल बजावणी खातें यांची फारकत करण्याची व्यवस्था सरकारनें केली पाहिजे.

( १७ ) जीं स्मारकें, स्थळें किंवा वस्तु कलेच्या परंपरेच्या दृष्टीनें राष्ट्रीय महत्त्वाचीं आहेत असें पार्लमेंट ठरवील त्यांचें रक्षण करणें म्हणजे मोडतोड

विकृति, नाश, उच्चाटन, वासलात किंवा निर्यात होणार नाहीं असें करणें, ही सरकारची जबाबदारी आहे.

( १८ ) सर्व कामकऱ्यांना काम, पुरेसें वेतन व चांगली राहणी लाभेल अशा प्रकारें कामाच्या जागेसंबंधीं केलेल्या योजना यांचा लाभ सरकारनें देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तसेंच विश्रांतीच्या वेळाचा योग्य उपभोग कामकऱ्यांना घेतां येईल आणि सामाजिक व सांस्कृतिक प्रगति करण्याची त्यांना संधि मिळेल अशी व्यवस्था करण्याचाहि प्रयत्न सरकारनें केला पाहिजे. विशेषेंकरून खेडेगांवांत लहान लहान धंदे ऊर्जितावस्थेस येतील असें सरकारनें केलें पाहिजे.

( १९ ) आंतरराष्ट्रीय सलोखा वाढवणें, राष्ट्राराष्ट्रांमध्यें न्याय्य व सन्मान्य संबंध प्रस्थापित करणें, संघटित राष्ट्रांमधील व्यवहारांत आंतरराष्ट्रीय कायदा व तहनामे यांना वाढता मान मिळेल असें करणें, राष्ट्राराष्ट्रांमधील कलहांचा निकाल लवाद पद्धतीनें करण्यास उत्तेजन देणें, या गोष्टी साधण्याचा सरकारनें प्रयत्न केला पाहिजे.

## सरकार म्हणजे काय

तिसऱ्या व चौथ्या भागांत जो सरकार शब्द वापरलेला आहे तो अतिशय व्यापक अर्थीं वापरलेला आहे. कायद्यानें प्रस्थापित केलेल्या सर्व शाखांचा त्यांत समावेश होतो. पार्लमेंट म्हणजेच अखिल भारताचें कायदेमंडळ, अखिल भारताचें सरकार, घटक राज्यांतील कायदेमंडळें, घटकराज्यांतील सरकारें, म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्डें आणि इतर अधिकारी मंडळें—मग तीं भारताच्या प्रदेशांत असोत वा भारत सरकारच्या हुकुमतीखालीं असोत—या सर्वांचा 'सरकार' या शब्दांत समावेश होतो. इंग्रजीमध्यें वापरलेला शब्द 'स्टेट' हा आहे. दुर्दैवानें हा शब्द आपल्या घटनेच्या कायद्यांत दोन निरनिराळ्या अर्थीं वापरला आहे. वर सांगितलेल्या व्यापक अर्थीं स्टेट हा शब्द वापरला आहे, शिवाय दरएक घटकराज्यालाहि तोच शब्द वापरला आहे.

---

# भाग पांचवा

# संघराज्य

इंग्रज सरकारच्या एकछत्री हुकुमतीखालीं संबंध हिंदुस्थान होता हें खरें, पण त्यांत कांहीं भागांवर ती हुकुमत अप्रत्यक्ष होती. त्या भागाला देशी राज्यें म्हणत असत आणि नकाशावर त्यांचा प्रदेश पिवळ्या रंगांत दाखवीत असत. १९३५ चा कायदा ज्या वेळीं इंग्लंडच्या पार्लमेंटानें पास केला त्या वेळीं महत्त्वाचे दोन फेरफार केले. देशी राज्यांना प्रत्यक्ष हिंदी राज्यांत समाविष्ट होण्याचा मार्ग निर्माण करण्यांत आला हा एक फरक आणि दुसरा फरक म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानांत जो एकसूत्री कारभार चालत होता त्याला सामवायिक स्वरूप देण्यांत आलें व त्यासाठीं निरनिराळ्या प्रांतांना स्वायत्त घटकांचें स्वरूप देण्यांत आलें. जीं देशी राज्यें हिंदी राज्यांत सामील होतील त्यांनाहि घटक राज्यांचा दर्जा मिळण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. अशा प्रकारें हिंदुस्थानचें फेडरेशन (सामवायिक राज्य) अस्तित्वांत येण्याची व्यवस्था १९३५ च्या कायद्यानें करण्यांत आली. त्याच कायद्यांत थोडासा फेरफार करून हिंदुस्थानाचे दोन देश झाले. एकाचें नांव हिंदुस्थान (इंडिया) आणि दुसऱ्याचें पाकिस्तान. या दोनहि देशांत देशी राज्यें होतीं.

## भारतीय संघराज्याचें वैशिष्ट्य

ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं हिंदुस्थानासाठीं कायदे करण्याचे सर्व अधिकार इंग्लंडच्या पार्लमेंटानें हिंदुस्थानाच्या घटनासमितीकडे बिनशर्त सुपूर्द केले. त्या तारखेपूर्वी बहुतेक सर्व संस्थानिकांनीं सामीलनाम्यावर सह्या केल्या होत्या. कांहीं दिवसांनंतर हैद्राबादखेरीज सर्व संस्थानांनीं सामीलनामे सादर केले. हैद्राबादेवर स्वारी करावी लागली हें सर्वांना माहीतच आहे. हीं जीं देशीं राज्यें होतीं तीं शेकड्यांनीं होतीं आणि त्या राज्यांत राजांची अनियंत्रित सत्ता चालत असे. १५ ऑगस्ट १९४७ नंतर ही परिस्थिति बदलली. सर्व संस्थानांत मंत्रिमंडळें स्थापन होऊन राजे हे सनदशीर कारभार करूं लागले; शिवाय अनेक संस्थानें तर शेजारच्या प्रांतांत विलीन

करण्यांत आलीं. ही उत्क्रांति पुरी झाली त्या वेळी फक्त आठ देशी संस्थानें घटक म्हणून राहिलीं. त्यांचीं नांवें पहिल्या भागांत दिलेलीं आहेत. दुसरीं कांहीं संस्थानें स्वतंत्रपणें अस्तित्वांत ठेवलेलीं आहेत त्यांचींहि नांवें पहिल्या भागांत दिलेलीं आहेत, पण या संस्थानांना स्वायत्त घटकांचा दर्जा नाहीं. कारण यांचा कारभार दिल्ली सरकारच्या हुकुमाप्रमाणें चालावा असें ठरलें. १५ ऑगस्ट १९४७ पासून ता. २६ जानेवारी १९५० पर्यंत हिंदुस्थानचा राज्यकारभार १९३५ च्या कायद्याला धरून चालला होता. संघराज्य अथवा फेडरेशन पूर्णपणें अस्तित्वांत आलें होतें. घटकांचे स्वायत्त कारभार चालू होते व हिंदुस्थानची घटनासमिति साधे कायदे करीत असतांना १९३५ च्या कायद्यांत घालून दिलेल्या मर्यादा पाळीत होती. घटनासमिति ज्या मुदतींत स्वतंत्र हिंदुस्थानासाठीं नवी घटना तयार करीत होती त्या मुदतींत हिंदुस्थानामध्यें फेडरल म्हणजे सामवायिक राज्यपद्धति अस्तित्वांत होती या ऐतिहासिक घटनेचा परिणाम नवीन घटनेवर झाला आहे यांत शंका नाहीं.

भारताच्या म्हणजेच हिंदुस्थानच्या नव्या राज्यघटनेच्या कायद्यांत फेडरेशन हा शब्द कोठेंहि नाहीं. पहिल्याच कलमांत जी व्याख्या दिलेली आहे त्या व्याख्येंत 'यूनियन' हा शब्द आहे. हाच शब्द अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या म्हणजे युनायटेड स्टेटसच्या घटनेंत आहे. १९३५ च्या कायद्यांत प्रांत आणि संस्थानें असे दोन प्रकारचे घटक होते. नव्या घटनेंत सर्व घटकांना स्टेट हें एकच नांव देण्यांत आलें आहे. फेडरेशनऐवजीं युनियन शब्द पसंत करण्यांत कांहीं तरी हेतु असला पाहिजे. हा शब्द कां पसंत करण्यांत आला हें अधिकृतपणें घटनासमितींत कोणीं सांगितलें होतें असें मला वाटत नाहीं. माझ्या मतें त्या पसंतीचीं दोन कारणें आहेत. पहिलें कारण हें कीं फेडरेशन शब्दांत फुटीरपणाची कल्पना जास्त प्रामुख्यानें चमकते असें वाटूं लागलें होतें आणि त्यामुळें तो शब्द एकप्रकारें बद्दू झाला होता. आपल्या नव्या घटनेंत एकीची कल्पना ज्यास्त प्रामुख्यानें जगापुढें आणि हिंदी जनतेपुढ येईल अशी शब्दयोजना करावयाची होती. दुसरें कारण ब्रिटिश पार्लमेंटानें केलेल्या

कायद्यांत वापरलेल्या शब्दापेक्षां निराळा शब्द वापरणें हें भावनेच्या दृष्टीनें उचित व परिणामकारक होतें. कसेंहि असो. आपल्या घटनेंत फेडरेशन शब्द नाहीं आणि यूनियन शब्द आहे हें लक्षांत ठेवावें.

पहिल्या कलमांतील व्याख्यत युनियन शब्द वापरून ऐक्याच्या कल्पनेवर भर दिला असला तरी 'स्टेटस्' हा अनेकवचनी शब्द वापरून घटकांच्या स्वतंत्र कायदेशीर अस्तित्वाला मान्यता दिलेली आहे हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. सामवायिक वा संयुक्त ( फेडरल ) राज्याची कल्पना १९३१ पासून म्हणजे अठरा एकोणीस वर्षे शिक्षित लोकांच्या बुद्धीची पकड घेऊन राहिली होती. भारत हा बारा लक्ष चौरस मैलांचा आणि बत्तीस कोटी लोकसंख्येचा विस्तीर्ण प्रदेश आहे. यांत अनेक भाषांचे लोक आहेत. भारतीय ऐक्यांत विविधता आहे ही गोष्ट सर्वांना मान्य आहे. नव्या घटनेच्या ३५१ व्या कलमांत हिंदुस्थानाची संस्कृति अनेकविध ( काम्पोझिट ) आहे हें नमूद केलेलें आहे. कलम २९ ( अ ) मध्यें निरनिराळ्या संस्कृतींचा ( डिस्टिंक्ट कल्चर ) उल्लेख करून त्या सर्वांचें रक्षण करण्याची हमी दिलेली आहे. असें असल्यामुळें हिंदुस्थानांत एकसूत्री किंवा एकविधा राज्यपद्धति स्थापन केलेली नाहीं. नागरिक शब्दाच्या व्याख्येंत भारताच्या ऐक्यावरच भर दिलेला आहे. कारण नागरिक हा भारताचा नागरिक आहे कोणत्याहि घटक राज्याचा नाहीं. नागरिकत्वासंबधीं कायदे करण्याचा अधिकार पूर्णपणें संघराज्याकडे ठेविलेला आहे, तो अधिकार घटक राज्यांना नाहीं. भारताच्या कोणत्याहि विभागांत फिरण्याचा, राहण्याचा अगर घरदार करण्याचा हक्क हरएक नागरिकाला घटनेच्या एकोणिसाव्या कलमांत दिलेला आहे आणि या हक्काला कोणतेंहि घटकराज्य बाधा आणूं शकत नाहीं. तरीहि संस्थानांचें म्हणजे घटकराज्यांचें मर्यादित कां होईना स्वतंत्र अस्तित्व घटनाकायद्यानें मान्य केलेलें आहे. घटक आणि संघ हे एक प्रकारें निराळे आहेत तर दुसऱ्या प्रकारें निराळे नाहींत. त्यांचे संबंध शरीर आणि अवयव यांच्या संबंधासारखे आहेत. अर्थात् ही पूर्णोपमा होऊं शकत नाहीं. हिंदुस्थानाची नवीन राज्यघटना ' फेडरल ' या विशेषणास पात्र आहे असें म्हणतां येणार नाहीं. पाहिजे तर फेडरेशनची ही एक

नवीन आवृत्ति आहे असें म्हणावें. ऐक्यावर भर देणारी ही एक तडजोड आहे असें म्हणणेंच योग्य होईल.

आजची भारतांतील परिस्थिति व आज सर्व घटकांत एकाच पक्षाच्या लोकांच्या हातांत अधिकारसूत्रें आहेत ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे मध्यवर्ति सरकाराकडेच सत्तेचा कल झुकणार हें निश्चित आहे. पंडित जवाहरलाल नेहरू व सरदार वल्लभभाई पटेल यांना स्पष्टपणें नापसंत अशी कोणती गोष्ट घटकराज्यांत होऊं शकेल? ज्या देशांत खरीखुरी फेडरल राज्यव्यवस्था स्थापन झालेली होती त्या देशांतसुद्धां दिवसेंदिवस मध्यवर्ति सरकार बलिष्ठ होत गेलें हें इतिहास सांगतो. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत मध्यवर्ती सरकाराकडे मोजका अधिकार आणि बाकीचा सर्व अधिकार घटकराज्याकडे, अशी व्यवस्था आहे. एका सुप्रसिद्ध लेखकानें असें लिहिलें आहे की अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत घटकांचा अधिकार हा नियम असून मध्यवर्ति सरकारचा अधिकार हा अपवाद आहे. डॉ. विडरो विल्सन यांनीं लिहिलें आहे कीं अमेरिकेचीं घटकराज्यें हीं नुसतीं घटक नसून त्यांना स्वतःचें मार्गदर्शन करण्याचा अधिकार आहे. इतकें महत्त्व घटकांना असून सुद्धां अमेरिकेंत वॉशिंग्टन सरकारचा अधिकार सारखा वाढत असतो अशी तक्रार आहे. गेल्या दीडशें वर्षांत अमेरिकेच्या घटनाकायद्यांत ज्या दुरुस्त्या झाल्या त्या सर्व दुरुस्त्या मध्यवर्ति सरकारचा अधिकार वाढवणाऱ्याच आहेत. अमेरिकेंतील घटकराज्यें आपली स्वायत्तता वापरणारीं होतीं आणि मध्यवर्ती सरकारला आक्रमण करूं देणारीं नव्हतीं. त्यांच्या अंतस्थ कारभारांत अध्यक्षाला ढवळाढवळ करतां येत नसे व नाहीं. हिंदुस्थानांतील घटकराज्यांना असा दर्जा नाही, हिंदुस्थानांतील घटकराज्यांत अशी वृत्ति बाळगणारे पुढारी नाहींत; आणि अध्यक्ष नव्हे पण अध्यक्षाच्या मंत्रिमंडळाचे पुढारी घटकांच्या अंतस्थ कारभारांत हस्तक्षेप करूं शकणारे आहेत. शिवाय या देशांत विचारवंतांमध्यें असा एक वर्ग आहे कीं घटकराज्यांना आज आहे एवढी स्वायत्ततासुद्धां देऊं नये असें तो म्हणतो. सन १९१९ पूर्वी हिंदुस्थानांत ज्या प्रकारची राज्यव्यवस्था होती त्या प्रकारची स्वतंत्र भारतांत असावी असें त्याचें मत आहे.

घटनेचा कायदा वाचतांना ठिकठिकाणीं अशीं कलमें आढळून येतात कीं

र्ती वर निर्दिष्ट केलेली विचारसरणी अमलांत आणल्याचें सिद्ध करतात. घटकांचे गव्हर्नर मध्यवर्ति सरकार नेमणार आणि विशिष्ट प्रसंगीं त्या गव्हर्नरांना आपल्या मंत्रिमंडळाचा सल्ला बाजूस सारण्याचा अधिकार रहाणार. घटक राज्याचा कारभार मध्यवर्ति सरकारकडे विशिष्ट परिस्थितींत जाऊं शकेल. घटनेंतील योजनेप्रमाणें सर्व घटकांतील कारभार चालतो आहे असें करणें हें मध्यवर्ति सरकारचें कर्तव्य आहे असें कलम ३५५ मध्यें आज्ञापिलें आहे. व्यापार, देवघेव व दळणवळण सर्व देशभर अव्याहत चालली पाहिजेत म्हणून जरूर ते कायदे करण्याचा अधिकार मध्यवर्ति सरकारकडे आहे. मध्यवर्ति कौंसिलनें घटकराज्याच्या अधिकार-क्षेत्रांतील एखाद्या बाबीसंबंधीं मध्यवर्ति पार्लमेंटानें क़ायदा करणें इष्ट वा अवश्य आहे असा ठराव दोन तृतीयांश बहुमतानें पास केला तर तसा कायदा करण्याचा अधिकार मध्यवर्ति पार्लमेंटास प्राप्त होईल. आर्थिक अधिकाराच्या बाबतींत मध्यवर्ति सरकारकडे थोडासा प्रत्यक्ष व बराचसा अप्रत्यक्ष अधिकार ठेवून त्या प्रमाणांत घटकराज्यांवर मध्यवर्ती सरकारची हुकमत ठेवलेली आहे. उदाहरणार्थ, कोणत्याहि घटक राज्याला हिंदुस्थानाच्या बाहेरून कर्ज आणण्याचा अधिकार नाहीं. इतकेंच नव्हे तर मध्यवर्ती सरकारचें ज्या घटकराज्यानें देणें आहे त्याला मध्यवर्ती सरकारच्या संमतीशिवाय मुळीं कर्ज काढतां येणार नाहीं. मध्यवर्ती सरकारकडे सबंध संघराज्याची पत जगाच्या बाजारपेठेंत राखावयाची असते आणि आर्थिक सामर्थ्य टिकवावयाचें असतें म्हणून असे नियम केले आहेत कीं जेणकरून संघराज्याच्या ऐक्याला, तसेंच आर्थिक स्थैर्याला व सामर्थ्याला घटकराज्यें बाध आणूं शकणार नाहींत. एका वाक्यांत सांगावयाचें म्हणजे संघराज्य वरिष्ठ असून घटक राज्यें दुय्यम आहेत हा सिद्धांत आपल्या राज्यघटनेच्या कायद्यांत ठळकपणें मांडलेला आहे.

असें जर आहे तर, सरळ एकसूत्री राज्यपद्धतीचा स्वीकार नव्या घटनेंत कां केला नाहीं हा प्रश्न उभा रहातो. या प्रश्नाचें उत्तर वर दिलेलें आहे. त्याशिवाय या प्रश्नाचें उत्तर घटनासमितीच्या पहिल्या अधिवेशनांत पास झालेल्या उद्दिष्टांच्या ठरावांत सांपडेल. त्या ठरावांत (१) संघराज्य स्थापन

करण्याचें, ( २ ) घटकांना स्वायत दर्जा देण्याचें, आणि ( ३ ) घटकांना शेषाधिकार देण्याचें–अशीं तीन आश्वासनें दिलेलीं होतीं. नंतर घडलेल्या घटनांमुळें जरी हा ठराव पूर्णपणें अमलांत आणतां आला नाहीं तरी संघराज्याची कल्पना सोडून देण्याची घटनासमितीची तयारी झाली नाहीं. त्यामुळें आपली नवी राज्यघटना ही एक तडजोडीची योजना झाली आहे. पाहिजे तर याला कोणी सुवर्णमध्य म्हणावें.

हिंदुस्थानासाठीं जी लिखित घटना तयार झाली आणि २६ जानेवारी १९५० पासून जिचा अंमल सुरू झाला त्या घटनेनें मर्यादित स्वरूपाचें कां होईना, हिंदुस्थानांत संघराज्य स्थापन केलें आहे आणि घटक व संघ यांचे अधिकार घटनेनेंच विभागून दिले आहेत. त्याप्रमाणें घटनेच्या कायद्यांतच राजसत्तेच्या निरनिराळ्या शाखांमध्यें अधिकाराची विभागणी केलेली आहे. प्रजेचें रक्षण करणें, प्रजेकडून करभार घेणें आणि प्रजेला न्याय देणें हें राजाचें पूर्वकालपासून मान्य झालेलें कर्तव्य आहे. यांपैकीं न्यायदान हें सर्वात उच्च दर्जाचें कर्तव्य समजलें जात असे. राजा हा विष्णूचा पृथ्वीवरील प्रतिनिधि आहे असें जें म्हटलें जात असे तें विशेषेंकरून न्यायदानाच्या सत्तेसंबंधीं म्हटलें जात असे. इंग्लंडमध्यें राजा हा सर्वाधिकारी होता त्यावेळीं सुद्धां न्यायदानाचें काम करणारे न्यायाधीश राजा नेमीत असे आणि न्यायाधिशाचा बोज राखण्यासाठीं जें करणें जरूर असे तें राजा करीत असे. चौथा हेनरी राज्य करीत असतांना त्याच्या न्यायाधिशानें इतर आरोपींबरोबर राजपुत्राला–जो पुढें पांचवा हेनरी या नांवानें राजा झाला–शिक्षा केली; त्या शिक्षेबद्दल चवथ्या हेनरीनें न्यायाधिशाला ठपका तर दिला नाहींच, उलट 'माझ्या राज्यांत इतका निःस्पृह न्यायाधीश आहे हें मला भूषण आहे' असें तो म्हणाला याचें कारणही तसेंच आहे. ( डिव्हाइन राइट् ऑफ किंग्ज) राजांचा परमेश्वरी अधिकार म्हटला म्हणजे निःपक्षपाती न्याय हा त्यांत अपरिहार्यपणें समाविष्ट झालाच पाहिजे. इंग्लंडचा सर्वांत मोठा न्यायाधीश म्हणजे लॉर्ड हायचॅन्सेलर याला तर "राजाच्या सदसद्विवेक बुद्धीचा रखवालदार" असें म्हणतात आणि सन १९३८ पर्यंत त्याचा पगार सर्वांत मोठा होता. त्याचें स्थान मुख्य प्रधानापेक्षां वरिष्ठ मानलें जात असे. न्याय-

दान हें राजसत्तेचें उच्चत्तम कर्तव्य आहे हा सिद्धांत पुरातनकालापासून आजपर्यंत अबाधितपणें मान्य करण्यांत आला आहे. याला अनुसरून भारतीय घटनेंत सरकारला हुकूम करण्याचा अधिकार कोर्टांना दिलेला आहे, कोर्टाला हुकूम करण्याचा अधिकार सरकारला दिलेला नाहीं. सुप्रीम कोर्टाला आणि पूर्वींच्या फेडरल कोर्टाला मदत करण्याची जबाबदारी घटनेच्या कायद्यानें सर्व मुलकी अधिकाऱ्यांवर टाकलेली आहे व होती.

सरकारवर न्यायालयाचा अंकुश नसेल तर जनतेला स्वातंत्र्याचा उपभोग घेतां येणार नाहीं. अमेरिकेच्या घटना कायद्याला धरूनच बहुंशीं आपल्या नव्या घटनेंत कोर्टाची स्थापना केलेली आहे. तशा तऱ्हेची ती नाहीं असें हिंदुस्थान सरकारचे मुख्य वकील श्री. मोतीलाल सेटलवाड यांनीं एकदां सुप्रीम कोर्टापुढें सांगितलें. श्री. सेटलवाड यांना वकील म्हणून आपलें म्हणणें मांडण्याचा हक्क आहे पण त्यांचें स्थान साध्या वकिलापेक्षां निराळें आहे. त्यांचें स्थान घटनेच्या कायद्यानें निर्माण केलेलें आहे. इंग्रज सरकारच्या जमान्यांत सरकारी वकिलांचें जें स्थान होतें तें मि. सेटलवाड यांचें नाहीं.

लिखित घटनेंत आणि विशेषेंकरून संघराज्याच्या घटनेंत सरकारच्या सत्तेवर अंकुश घातलेले असतात आणि त्या अंकुशांचा अंमल करण्याचा अधिकार वरिष्ठ न्यायकोर्टांना दिलेला असतो. इंग्लंडच्या राजाला व त्याच्या अधिकाऱ्यांना कायद्याच्या कक्षेंत राहावयास कोणीं भाग पाडीत असेल तर तीं कायद्याचीं कोर्टें होत. इतकेंच काय पण इंग्लंडच्या पार्लमेंटाचा अधिकार निरंकुश आहे हें सुद्धां त्या देशांतल्या कोर्टांनीं ठरविलें. इतकें महत्त्वाचें निर्णायक आणि वरिष्ठ स्थान न्यायकोर्टाचें आहे या सिद्धांताची जाणीव सर्वांना करून देण्याकरितां त्याचा वारंवार पुनरुच्चार केला पाहिजे.

## कायदे कोणीं करावे.

पुरातन कालीं राजसत्तेचीं कर्तव्यें कोणतीं होतीं हें वर दिलें आहे. त्या काळांत कायदे करण्याचा अधिकार राजसत्तेला नव्हता. तो अधिकार ऋषीमुनि किंवा मान्यवर विचारवंत यांचेकडे होता. राजा फक्त न्यायदान करीत असे. नैतिक गुन्हे तेवढेच गुन्हे समजले जात असत, आणि हे गुन्हे कोणते हें सर्वसाधारणपणें मान्य असे. वारशाचे कायदे राजा करीत नसे,

ते स्मृतिकार करीत असत. अलीकडे कायदे करण्याचें काम राजसत्ता करूं लागली आहे, आणि दिवसेंदिवस तें काम वाढत्या प्रमाणांत होत आहे. अनैतिक कृति म्हणजेच गुन्हा असें पूर्वी असे. आतां मना केलेली गोष्ट म्हणजेच गुन्हा असें समजलें जातें. आतां कायदे करून जनतेवर यमनियम लादले जातात. अशी आतां प्रथा पडली असल्यामुळें कायदे करणें हें राजसत्तेचें एक अंग व कर्तव्य होऊन बसलें आहे.

## राज्यव्यवस्थेचे तीन भाग

"There is wonderfully little genuine inventiveness in the world and perhaps least of all has been shown in the sphere of political institutions."

'अमेरिकन. कॉमनवेल्थ' या ग्रंथाचे सुप्रसिद्ध लेखक मि. जेम्स ब्राइस यांचें हें वचन आहे. अगदीं नवी निर्मिती अशी या जगांत फार थोडी असते आणि त्यांतल्या त्यांत राजनीतीच्या क्षेत्रांत तर अगदींच थोडें नवीन असें असतें, असें त्यांचें विधान आहे. राजसत्तेच्या अधिकारक्षेत्राची विभागणी करण्याच्या बाबतींत हें विधान तंतोतंत लागू पडतें असें म्हटलें तर फारसें वावगें होणार नाहीं. कायदे करणें ( यांतच खर्चाला मंजुरी देणें आणि कर लादणें यांचा समावेश होतो ), कायद्याला धरून राज्याचा कारभार चालविणें, आणि न्यायदान करणें असे तीन विभाग करण्याची आतां सर्वमान्य प्रथाच पडल्यासारखी आहे. त्या प्रथेला अनुसरून हिंदुस्थानच्या नव्या घटनेमध्यें अधिकाराची विभागणी केलेली आहे. लेजिस्लेटिव्ह, एक्झिक्युटिव्ह आणि ज्युडीशियल असे हे तीन विभाग आहेत. १९३५ चा कायदा इंग्लंडच्या पार्लमेंटानें केला होता त्यांत न्यायकोर्टासाठीं एक स्वतंत्र प्रकरण देण्यांत आलें होतें. सर मॉरिस ग्वायर हिंदुस्थानच्या फेडरल कोर्टाचे सर न्यायाधीश होते. आणि त्या स्थानावरून ढळल्यानंतरहि दिल्ली विद्यापीठाचें व्हाईस चान्सेलर होते. त्यांना निरोप देतांना हल्लींचे राष्ट्रपति आणि घटनापरिषदेचे अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद म्हणाले कीं, १९३५ चा कायदा हाच हिंदुस्थानच्या नव्या राज्यघटनेचा पाया झाला. मि. ब्राइस यांच्या विधानाला

डॉ. राजेंद्रप्रसाद यांचा अशा तऱ्हेनें पाठिंबाच मिळाला आहे. अधिकार विभागणीच्या बाबतींत तर डॉ. राजेंद्रबाबू यांचें म्हणणें अगदीं यथार्थ आहे. पण एका बाबतींत आपल्या नव्या घटनेच्या कर्त्यांनीं १९३५ च्या कायद्यापेक्षां निराळ्या व्यवस्थेचा अवलंब केला आहे. मोठ्या खेदानें म्हणावें लागतें कीं, नव्या घटनेनें केलेली व्यवस्था सुधारणेच्या वर्गातील नसून कुधारणेच्या वर्गातील आहे. न्यायकोर्टाचें स्वतंत्र प्रकरण काढून त्याचे तुकडे करण्यांत आले आणि संघराज्याच्या प्रकरणांत सुप्रीम कोर्टाचा समावेश करण्यांत येऊन हायकोर्टाचा समावेश घटक राज्यांच्या प्रकरणांत करण्यांत आला आहे. या फरकाला केवळ तांत्रिक नव्हे तर तात्त्विक महत्त्व आहे. अमेरिकन राज्यघटनेंत जें समर्थ स्थान न्यायकोर्टाना दिलेलें आहे तसें स्थान हिंदुस्थानच्या राज्यघटनेंत दिलेलें नाहीं, असें जें सरकारतर्फे सुप्रीमकोर्टापुढें सांगण्यांत आलें तें या नव्या व्यवस्थेमुळेंच होय.

घटनेचा बराचसा भाग राज्याचा कारभार चालवणाऱ्या शाखेनें अडविला आहे असें आढळून येईल. इंग्लंडमध्यें ‘ पार्लमेंट ’ वरिष्ठ आहे आणि लोकशाहीचें तें प्रतीक आहे. इंग्लंडमध्यें व्यक्तीला महत्त्व नाहीं. प्रसंगानुसार एखाद्या व्यक्तीला महत्त्व येत नाहीं असें नाहीं. उदाहरणार्थ युद्धकालांत मि. चर्चिल हे विभूतिपुरुष होऊन बसले होते; पण युद्ध संपतांच इंग्लंडच्या जनतेनें त्यांना अधिकारपदापासून दूर केलें. इतकें मर्यादित महत्त्व इंग्लंडमध्यें व्यक्तीला आहे. कारण तेथील जनता लोकशाहीची भोक्ती आहे. इंग्लंडच्या पार्लमेंटाचें इंग्लंडांत जें स्थान आहे तें हिंदुस्थानांतील पार्लमेंटाला मिळणार नाहीं. पण जुन्या ऋषिमुनींचें स्थान-वसिष्ठ, पराशर, याज्ञवल्क्य, मनु, यांचें स्थान–हिंदुस्थानांतील पार्लमेंटास मिळालें पाहिजे. घटनाकायद्याकडे पाहतां तसें स्थान हिंदुस्थानच्या पार्लमेंटास नाहीं आणि देशांतील वातावरणांत सुद्धां पार्लमेंटाचें तें स्थान नाहीं. आज नेहरू व पटेल यांनाच सर्वत्र स्थान आहे. सरकार या शब्दाचा आपण साधारणपणें जो मर्यादित अर्थ करतों त्या अर्थीचें सरकार हेंच आज अत्यंत मोठें किंबहुना सर्वव्यापी स्थान व्यापून बसलें आहे. असें असण्याचें कारणहि हिंदी जनतेच्या मनोरचनेंत आहे. त्या मनोरचनेची लोकशाहीकडे प्रगति कधीं होईल हें आज अजमावणें शक्य नाहीं.

# ( १ )

## राष्ट्रपति

ज्या तीन शाखांमध्यें सरकारच्या अधिकाराची विभागणी करण्यांत आली आहे त्यांचीं नावें यापूर्वींच देण्यांत आलीं आहेत. अधिकारविभागणी करतांना थोडेंसें अमेरिकेच्या घटनेचें, थोडेंसें फ्रान्सच्या घटनेचें आणि पुष्कळसें इंग्लंडचें अनुकरण केलेलें आहे. डॉ. आंबेडकरांवर तर इंग्लंडची घनदाट छाया पसरलेली असल्यामुळें इंग्लंडचें पुष्कळसें अनुकरण आपल्या घटनेंत दिसलें आणि १९३५ चा कायदा आपल्या नव्या घटनेचा पाया झाला यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींच नाहीं. हिंदुस्थानांत 'रिपब्लिक' स्थापन व्हावयाचें असल्यामुळें इंग्लंडच्या राजाची जागा अध्यक्षाकडे देण्यांत आली. अध्यक्ष जन्मानें निर्माण होऊं शकत नाहीं. अध्यक्ष किंवा आतां म्हणावयाचें म्हणजे 'राष्ट्रपति' निवडणुकीनेंच निर्माण करावा लागणार. पण भारताचा अध्यक्ष अमेरिकन अध्यक्षाप्रमाणें लोकांकडून निवडला जाणार नाहीं. त्याची निवडणूक फ्रान्समधील पद्धतीनें व्हावयाची आहे. अध्यक्षाचा अधिकारसुद्धां अमेरिकन अध्यक्षासारखा नसून बराचसा इंग्लंडच्या राजाच्या अधिकारासारखा आहे. इंग्लंडच्या सरकारला 'हिज मॅजेस्टीज गव्हर्नमेंट' म्हणजे राजाचें सरकार असें म्हणतात. पण राजा मात्र आपल्या मंत्रिमंडळाच्या सल्ल्याशिवाय इकडची काडी तिकडे करूं शकत नाहीं. भारताच्या राष्ट्रपतीची तशीच अवस्था आहे. भारताच्या संघराज्याचें एक मंत्रिमंडळ आहे आणि या मंत्रिमंडळाचा सल्ला निवडणुकीची बाब खेरीज करून राष्ट्रपतीनें ऐकलाच पाहिजे. निवडणुकीच्या क्षेत्रांत दुसरा एक अधिकारी घटनेच्या कायद्याप्रमाणें राष्ट्रपतीनें नेमावयाचा असून त्याच्या सल्ल्याप्रमाणें त्या क्षेत्रांतील कारभार केला पाहिजे.

भारताच्या राष्ट्रपतींच्या हातांत संघराज्याच्या कारभाराचा जो सर्व अधिकार आहे तो अशा प्रकारचा असल्यामुळें त्याची निवडणूक अप्रत्यक्ष पद्धतीनें व्हावी असें घटनाकायद्यांत ठरविलें आहे. संघराज्याचें पार्लमेंट आणि सर्व घटकराज्यांतील लोकसभा ( असेंब्ली ) यांच्या सभासदांनीं एके ठिकाणीं जमून राष्ट्रपतीची निवडणूक करावयाची आहे. अमेरिकेचा अध्यक्ष लोकांकडून

निवडला जातो, कारण त्याच्या हातांत खरी खुरी राजसत्ता असते. अमेरिकेंतील मंत्रिमंडळ अध्यक्षाला जबाबदार असतें, तेथील पार्लमेंटला नाहीं. भारताच्या संघराज्याचें मंत्रिमंडळ पार्लमेंटला जबाबदार आहे हें ब्रिटिश राज्यघटनेंतील तत्त्वाला धरून आहे.

## उपराष्ट्रपति

राष्ट्रपतीच्या जोडीला एक उपाध्यक्ष किंवा उपराष्ट्रपति नेमण्याची व्यवस्था आपल्या घटनेंत केलेली आहे. याची निवड फक्त पार्लमेंटच्याच सभासदांनीं करावयाची आहे. राष्ट्रपतीला नेहमींचें राज्यकारभाराचें काम आहे तस या उपराष्ट्रपतीला नाहीं. जेव्हां कोणत्याहि कारणानें राष्ट्रपतींचें स्थान तात्पुरतें रिकामें होईल त्यावेळीं राष्ट्रपतीचें स्थान व अधिकार उपराष्ट्रपतीकडे येतील. एरवींच्या काळांत त्याचें स्थान पार्लमेंटाच्या एका सभेंत म्हणजे कौन्सिलमध्यें अध्यक्षाचें आहे.

हल्लींचे राष्ट्रपति घटनासमितीनें निवडलेले आहेत. ही तात्पुरती व्यवस्था आहे. घटना कायद्यानें नेमून दिल्याप्रमाणें पार्लमेंटाचीं दोन सभागृहें आणि घटकराज्यांतील कायदेमंडळें यांच्या निवडणुकी होतील त्यानंतर राष्ट्रपतीची रीतसर निवडणुक होईल. तोपर्यंत आजचे राष्ट्रपति डॉ. राजेंद्र प्रसाद हेच राष्ट्रपति राहतील.

अमेरिकेचा अध्यक्ष चार वर्षांकरितां निवडतात. त्या मुदतींत जर अध्यक्ष सेवानिवृत्त झाला तर उपाध्यक्षाची अध्यक्ष म्हणून आपोआप नेमणूक होते आणि अध्यक्षानें उपभोगलेला काल वजा करून चार वर्षातील जी मुदत बाकी असेल तेवढीच त्याला मुदत मिळते. हिंदी घटनाकायद्यांत निराळी व्यवस्था केली आहे. कोणत्याहि कारणानें जर राष्ट्रपतींचें स्थान रिकामें झालें तर नव्या राष्ट्रपतीची निवडणूक होईल, आणि नवा राष्ट्रपति अधिकारारूढ झाल्यापासून पांच वष अधिकारावर राहील. अमेरिकन अध्यक्षाच्या निवडणुकीबरोबर तेथील पार्लमेंटाच्या म्हणजे कॉंग्रेसच्या निवडणुकी होतात. हिंदुस्थानांत तसें होईलच असें नाहीं.

राष्ट्रपति व उपराष्ट्रपति या दोघांनाहि पगार मिळतो. आज राष्ट्रपतीचा

पगार दरमहा दहा हजार रुपये आहे. शिवाय रहावयाची जागा फुकट आणि इतरहि कांहीं सवलती राष्ट्रपतीला मिळतात. उपराष्ट्रपतीचा पगार पार्लमेंट ठरवील. अजून उपराष्ट्रपतीची नेमणूक झालेली नाहीं. दोन सभागृहांचें पार्लमेंट बनेल त्यावेळीं उपराष्ट्रपति निवडला जाईल.

राष्ट्रपतीच्या जागेवर असणाऱ्या व्यक्तीविरुद्ध फौजदारी खटला भरतां येणार नाहीं आणि त्या व्यक्तीला पकडण्याचा अगर अटकेंत ठेवण्याचा हुकूम कोणतेंहि कोर्ट देऊं शकणार नाहीं.

राष्ट्रपतीच्या जागेवर असणाऱ्या व्यक्तीला राजीनामा देऊन सेवानिवृत्त होण्याचा हक्क आहे. तसेंच जर घटनाकायद्याचा भंग केल्याचा आरोप त्या व्यक्तीवर सिद्ध झाला तर त्याला पार्लमेंट पदच्युत करूं शकतें. असा आरोप करावयाचा अधिकार पार्लमेंटच्या कोणत्याहि सभागृहास आहे, इतर कोणासहि नाहीं. एका सभागृहानें आरोप केल्यास त्याची चौकशी दुसऱ्या सभागृहानें केली पाहिजे. आरोप ठेवण्यासंबंधींचा ठराव दोन तृतीयांश बहुमतानें पास झाला पाहिजे; तसेंच आरोप शाबीत झाल्याचा ठरावहि दोन तृतीयांश बहुमतानेंच पास झाला पाहिजे.

ज्या राष्ट्रपतीला पदच्युत केलेलें नाहीं अगर ज्यानें राजीनामा देऊन आपलें स्थान रिकामें केलेलें नाहीं त्या राष्ट्रपतीची पांचवर्षाची मुदत पुरी झाली तरी दुसऱ्या राष्ट्रपतीची रीतसर निवडणूक होईपर्यंत तोच अधिकारारूढ राहील. राष्ट्रपतीचें वय कमींत कमी पस्तीस वर्षाचें असलें पाहिजे. राष्ट्रपतीच्या स्थानावर बसलेल्या व्यक्तीला पार्लमेंटाचा अगर घटक राज्याच्या कायदे-मंडळाचा सभासद होतां अगर राहतां येणार नाहीं.

मुलकीप्रमाणेंच सर्व प्रकारच्या लढाऊ खात्यांवर राष्ट्रपतीची हुकमत राहील.

इंग्लंडच्या राजाला जसा दयेचा अधिकार आहे तसाच भारताच्या राष्ट्रपतीस आहे. लष्करी कोर्टांनीं दिलेली शिक्षा कमी करण्याचा किंवा रद्द करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे.

संघराज्याचा अध्यक्ष किंवा राष्ट्रपति म्हणजे अखिल भारताचें मुख आहे. सरकारी काम मंत्र्यांच्या सल्ल्यानें चालवावयाचें असलें तरी राष्ट्रपतीच्या नांवानेंच चाललें पाहिजे. परराष्ट्रांतील वकील राष्ट्रपतीचे

प्रतिनिधि म्हणून जाणार व बोलणार. तसेंच परराष्ट्रांचे भारतांतील वकील प्रथम आपलीं अधिकारपत्रें राष्ट्रपतीस सादर करणार.

वरिष्ठ कोर्टाचे आणि सर्व हायकोर्टाचे न्यायाधीश नेमण्याचा अधिकार राष्ट्रपतीसच आहे. घटकराज्यांच्या गव्हर्नरांच्या नेमणुकाहि राष्ट्रपतीकडून होतील. सबंध देशाच्या सरकारी उत्पन्नाचा व खर्चाचा हिशेब तपासण्यासाठीं जो अधिकारी घटनेप्रमाणें नेमावयाचा आहे त्याचीहि नेमणूक राष्ट्रपतीनेंच करावयाची आहे.

निवडणुकीसंबंधीं सर्व व्यवस्था करण्यासाठीं एक कमिशन नेमलें पाहिजे असें घटनाकायद्यांत फर्माविलें आहे. हें कमिशन नेमण्याचा अधिकार राष्ट्रपतीकडेच आहे.

याशिवाय अनेक कमिशनें व खास अधिकारी नेमण्याचा अधिकार राष्ट्रपतीस दिलेला आहे.

पार्लमेंटच्या सभेंत हजर राहून भाषण करण्याचा आणि पार्लमेंटाकडे खलितें पाठविण्याचा राष्ट्रपतीस अधिकार आहे.

तात्पुरते कायदे (आर्डिनन्स) जारी करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे.

एकाद्या घटकराज्यांत अंदाधुंदी चालली असेल तर त्या घटक राज्याचा सर्व कारभार संघराज्याच्या मंत्रिमंडळाकडे किंवा पार्लमेंटाकडे देण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे.

निवडणुकीचें खातें खेरीज करून बाकीचा राष्ट्रपतीचा सर्व अधिकार म्हणजे संघराज्याच्या मंत्रिमंडळाचा अधिकार आहे. त्यामुळें राष्ट्रपति हुकुमशहा ( dictator ) होऊं शकणार नाहीं.

## ( २ )

## मंत्रिमंडळ

संघसरकारचें एक मंत्रिमंडळ असलें पाहिजे अशी योजना भारताच्या नव्या राज्यघटनेंत आहे. इंग्लंडमधील मंत्री जसे राजाकडून नेमिले जाणार तसेच आपल्या संघराज्याचे मंत्री राष्ट्रपतींकडून नेमले जाणार. आपल्या घटनेंत

तशी व्यवस्था करावी लागली; इंग्लंडमध्यें कोणत्याहि कायद्यांत तसें सांगितलेलें नाहीं हा फरक लक्षांत ठेवावा. इंग्लंडमध्यें तांत्रिक दृष्ट्या कोणत्याहि मंत्र्याला अधिकारावरून दूर करण्याचा अधिकार राजाला आहे. तसाच हिंदच्या राष्ट्रपतीलाहि तो अधिकार आहे. इंग्लंडमध्यें राजा आपल्या जबाबदारीवर कोणत्याहि मंत्र्याला बडतर्फ करीत नाहीं. एखाद्या मंत्र्यानें राजीनामा दिला तर तो मुख्य मंत्र्याच्या हातांत जातो आणि मुख्य मंत्र्यानें सल्ला दिला तरच राजा त्या राजीनाम्याचा स्वीकार करतो. आपल्या घटनेंत हीच व्यवस्था कायद्यानें ठरवून दिली आहे. इंग्लंडमध्यें जोंपर्यंत मुख्य मंत्र्याला हाऊस ऑफ कॉमन्समध्यें बहुमताचा पाठिंबा आहे तोंपर्यंत त्याला कोणताहि राजा बडतर्फ करूं शकणार नाहीं. राजाच्या अधिकारापेक्षां हाऊस ऑफ कॉमन्सचा अधिकार श्रेष्ठ आहे अशी व्यवस्था इंग्लंडमध्यें आहे. पण ही व्यवस्था कोणत्याहि कायद्याच्या कलमांत नमूद केलेली नाहीं त्यामुळें राजाचें मंत्रिमंडळ, राजानें मंत्री नेमावे व काढावे, आणि हाऊस ऑफ कामन्सला हें मंत्रिमंडळ जबाबदार असावें, या परस्परविरुद्ध गोष्टी इंग्लंडमध्यें शोभून जातात. हिंदच्या राज्यघटनेंत कलम ७५ मध्यें दोन परस्परविरुद्ध गोष्टी कायद्यांत ग्रथित केलेल्या आहेत. ज्या दोन पोटकलमांत ही व्यवस्था ग्रथित केली आहे त्यांचें श्री. देवगिरीकर यांनी केलेलें भाषांतर पुढें देण्यांत येत आहे :

७५ ( २ ) राष्ट्रपतीची मर्जी असे तों हे मंत्री अधिकारपदावर राहातील.
( ३ ) मंत्रिमंडळ हें संयुक्तपणें लोकसभागृहाला जबाबदार राहील.

जर मंत्रिमंडळ लोकसभेला जबाबदार राहील तर त्याचें अधिकारावर रहाणें हें राष्ट्रपतीच्या मर्जीवर अवलंबून नसून लोकसभेच्या मर्जीवर अवलंबून आहे हें उघड होत आहे. कोणी असा श्लेष काढील कीं वैयक्तिक दृष्ट्या मंत्री राष्ट्रपतीच्या मर्जीनुरूप अधिकारपदावर राहील आणि सामवायिक दृष्ट्या मंत्रिमंडळ लोकसभेला जबाबदार राहील. पण आमच्या घटनापंडितांना हा श्लेष मुळीच मान्य होणार नाहीं. या दोन पोटकलमांचा मिलाफ कोणी तरी घालीलच !

सामवायिक जबाबदारी ही जबाबदार राज्यपद्धतीची मशाल आहे असें म्हटलें तरी चालेल. हिचें प्रत्यंतर नेहेमींच सारखें येतें असें नाहीं.

उदाहरणार्थ जबाबदारीच्या तत्त्वाचा जो मायदेश त्या इंग्लंडमध्यें वैयक्तिक मंत्र्यांचे राजीनामे स्वीकारण्यांत आले आहेत. ज्यावेळीं मुख्य मंत्री राजीनामा देतो त्यावेळीं मात्र मंत्रिमंडळाचा सामवायिक राजीनामा दिलेला असतो. सन १९१७ सालीं सर ऑस्टेन चेंबरलेन यांनीं हिंदुस्थानच्या सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या जागेचा राजीनामा दिला. त्यावेळीं मंत्रिमंडळाचा सामवायिक राजीनामा सादर केला नव्हता. चेंबरलेनची जागा मि. मॉंटेग्यु यांना देण्यांत आली. पांच वर्षांनीं मि. मॉंटेग्यु यांनीं त्याच अधिकारपदाचा राजीनामा दिला त्यावेळींहि मंडिमंडळाचा सामवायिक राजीनामा देण्यांत आला नव्हता. मि. मॉंटेग्यूच्या जागीं लॉर्ड पीलची नेमणूक झाली. मि. नेव्हिल चेंबरलेन मुख्य प्रधान झाल्यावेळीं मि. अँथनी ईडन परराष्ट्रमंत्री होते. त्यानंतर कांहीं दिवसांनीं मि. ईडन यांनीं राजीनामा दिला. त्यावेळीहि मंत्रिमंडळानें सामवायिक राजीनामा दिला नाहीं. मि. ईडनच्या जागीं लॉर्ड हॅलिफॅक्स यांची नेमणूक झाली. पुढें ज्यावेळीं मि. नेव्हिल चेंबरलेन यांनीं राजीनामा दिला त्यावेळीं सामवायिक राजीनामा सादर करण्यांत आला आणि चर्चिल यांना सर्वच्या सर्व मंत्रिमंडळ पुनश्च बनवावें लागलें. इंग्लंडमध्यें या गोष्टी समजुतीनें होत असतात; तांत्रिक नियमबद्धतेच्या आहारीं इंग्लंडचा राज्याचा कारभार जात नाहीं तरी सुद्धां तो शिस्तींत रहातो, हें इंग्लंडचें वैशिष्ट्य आहे.

## जबाबदारीचे परिणाम

अमेरिकेंत जी स्पष्ट अधिकारविभागणी आहे तिचा परिणाम असा होतो कीं कायदे करणाऱ्या अधिकारी संस्थेचा राज्यकारभाराशीं संबंध येत नाहीं. कारण सरकारी सत्ता अध्यक्षांच्या हातांत आहे आणि अध्यक्ष जें करतो त्याबद्दल तो कॉंग्रेसला जबाबदार नसतो. अध्यक्षानें अगदींच झारशाही गाजवूं नये म्हणून त्याचे कांहीं अधिकार असे आहेत कीं त्यांत तेथील पार्लमेंटची म्हणजे कॉंग्रेसची वरिष्ठ सभा म्हणजे सीनेट भागीदार असते. पण कॉंग्रेसला अध्यक्ष किंवा मंत्रिमंडळ जबाबदार होऊं शकत नाहीं. कांहीं वेळां अमेरिकेंत कसें घडतें कीं अध्यक्ष एका पक्षाचा आणि हाऊस ऑफ रिप्रेझेंटे-टिव्हजमध्यें म्हणजे तेथील लोकसभेंत दुसऱ्या पक्षाचें बहुमत. असें जेव्हां

होतें तेव्हां दोन वर्षेपर्यंत सरकार व कायदेमंडळ यांचा सारखा झगडा चालू असतो; पण अध्यक्षाला राजीनामा द्यावा लागत नाहीं. त्याचें राज्य चालूच असतें. या व्यवस्थेंत कायदेमंडळ राज्यकारभारांत भागीदार होऊं शकत नाही. अध्यक्ष सरळ लोकांना जबाबदार असतो. इंग्लंडमध्यें किंवा इंग्लंडची पद्धत उचलणाऱ्या भारतामध्यें प्रधानमंडळ पार्लमेंटाला जबाबदार असतें, सरळ लोकांना जबाबदार नसतें. लोकांना पार्लमेंट जबाबदार असतें. मंत्रिमंडळाला अधिकारावर ठेवणें अगर अधिकारावरून काढणें हे पार्लमेंटाचें काम असतें. परिणाम असा कीं राज्यकारभाराची जबाबदारी पार्लमेंटवर पडते आणि म्हणूनच अशा देशांत पार्लमेंटचें काम कायदे करून संपत नाहीं. राज्यकारभाराकडे लक्ष देणें हेंहि पार्लमेंटाचें काम होऊन बसतें. केवळ लेजिस्लेचर (कायदे करणारा घटक) हे पार्लमेंटचें जें वर्णन आपल्या घटनेच्या कायद्यांत केलेलं आहे तें पूर्णपणें रास्त नाहीं. तें वर्णन अपुरें आहे. पार्लमेंटचा एक एक सभासद कोणताहि अधिकार वापरूं शकत नाहीं. पण पार्लमेंटला राज्य-कारभारांत हात घालण्याचा सामवायिक अधिकार आहे. इंग्लंडमध्यें तांत्रिक दृष्ट्या सर्व सरकारी अधिकार राजाचा आहे म्हणून तेथील पार्लमेंटला ज्या कांहीं तांत्रिक मर्यादा पाळाव्या लागतात त्यासुद्धां हिंदुस्थानमध्यें पार्लमेंटला पाळण्याचें कारण नाहीं. केवळ मंत्री पार्लमेंटला जबाबदार आहेत असें नव्हे, तर अध्यक्ष सुद्धां पार्लमेंटला जबाबदार आहे असें कांहीं अंशीं म्हणतां येईल. संघराज्याचें पार्लमेंट आणि सर्व घटक राज्यांतील लोकसभा यांनीं मिळून अध्यक्षाची म्हणजे राष्ट्रपतीची नेमणूक करावयाची असून केवळ संघराज्याच्या पार्लमेंटांतील दोनहि सभांमधील दोन तृतीयांश बहुमताला राष्ट्रपतीचें अधिकारस्थानावरून उच्चाटण करण्याचा अधिकार आहे. सर्व अधिकार लोकांचा आहे आणि घटनेच्या कायद्यानें तो पार्लमेंट आणि घटकांतील लोकसभा यांच्या स्वाधीन केला आहे. कारण लोकांकडून फक्त त्यांच्याच निवडणुकी व्हावयाच्या आहेत. हिंदुस्थानच्या घटनेंत स्पष्ट विभागणी नाहीं हा सिद्धांत संघाच्या सरकारी वकिलानें सुप्रीम कोर्टापुढें मांडला तो न्यायालयांना लागू नसला तरी सरकार आणि कायदेमंडळ यांच्यापुरता पूर्णपणें रास्त आहे.

जबाबदारीचें तत्त्व प्रघाताच्या अवस्थेंत न ठेवतां कायद्याच्या स्वरूपांत नमूद केल्यामुळें पार्लमेंट हें अंमलबजावणीच्या यंत्राचा घटक बनतें एवढेंच पुनरुक्तीचा दोष पत्करून या ठिकाणीं स्पष्ट करण्यांत येत आहे.

## ( ३ )

## पार्लमेंट

संघराज्यासाठीं कायदे करणाऱ्या संस्थेला पार्लमेंट अशी संज्ञा दिलेली आहे. पार्लमेंटची व्याख्या घटनाकायद्याच्या ७९ कलमामध्यें दिलेली आहे. पार्लमेंटचीं तीन अंगें अगर शाखा आहेतः ( १ ) राष्ट्रपति ( २ ) कौन्सिल ऑफ स्टेट्स ( ३ ) लोकसभा.

कौन्सिल ऑफ स्टेट्स बनवितांना अमेरिकेंत सीनेटसंबंधीं जी कांहीं वर्षांपूर्वी व्यवस्था चालू होती ती स्वीकारलेली आहे. कौन्सिल ऑफ स्टेट्सचे जास्तींत जास्त सभासद २५० असूं शकतील. प्रत्यक्ष लोकांनीं निवडलेला एकहि सभासद या सभेमध्यें असावयाचा नाहीं. यांपैकीं बारा सभासद राष्ट्रपतीनें नेमावयाचे असून बाकीचे सभासद घटकराज्यांच्या लोकसभांतील सभासदांनीं निवडावयाचे आहेत. कांहीं घटक असे आहेत कीं, त्यांचा कारभार संघराज्याकडूनच चालतो. या घटकांकडून नेमले जावयाचे सभासद कसे निवडावे हें कायदा करून ठरवण्याचा अधिकार पार्लमेंटला दिलेला आहे.

## कौन्सिल ऑफ स्टेट्स

कौन्सिलमधील जागाची वांटणी घटनाकायद्याच्या चौथ्या परिशिष्टांत दिली आहे ती अशी आहे.

आसाम ६, बिहार २१, मुंबई १७, मध्यप्रदेश १२, मद्रास २७, ओरिसा ९, पंजाब ८, उत्तरप्रदेश ३१, बंगाल १४, हैद्राबाद ११, काश्मीर ४, मध्यभारत ६, म्हैसूर ६, पत्याळा व पूर्वपंजाब संस्थानसंघ ३, राजस्थान ९, सौराष्ट्र ४, त्रावणकोर कोचीन ६, विंध्यप्रदेश ४, अजमीर व कुर्ग १, भोपाळ १, बिलासपूर व हिमाचल प्रदेश १, कुचबिहार १, दिल्ली १, कछ १, मणिपूर व त्रिपुरा १, या सर्व जागांची बेरीज २०५ आहे. म्हणजे सध्यां तरी कौन्सिलचे सभासद २१७ पेक्षां अधिक होऊ शकणार नाहींत.

राष्ट्रपतीनें नेमावयाचे बारा सभासद हे साहित्य, विज्ञानशास्त्र, कला आणि समाजसेवा यांत पारंगत असलेल्या व्यक्तींमधून पसंत केले पाहिजेत.

संघराज्याचा उपराष्ट्रपति हा कौन्सिलचा अध्यक्ष असावयाचा. त्याशिवाय एक उपाध्यक्ष निवडण्याचा अधिकार कौन्सिलला आहे. या दोनहि अधिकाऱ्यांना पगार देण्यांत येईल.

कौन्सिलच्या सभासदांचें कमीतकमी वय तीस वर्षांचें असलें पाहिजे आणि हरएक सभासद हिंदुस्थानचा नागरिक असला पाहिजे.

कौन्सिल ही सभा कधीं बरखास्त व्हावयाची नाहीं. या बाबतींतहि आपल्या देशाच्या घटनेंत अमेरिकेच्या घटनेची नक्कल केलेली आहे. याचा अर्थ एकदां सभासद झाला म्हणजे त्याला सभासदत्वाचें आजीव वतन मिळालें असा मात्र नव्हे. व्यक्तिशः सभासदत्वाची मुदत जास्तींत जास्त सहा वर्षें असूं शकेल. ती मुदत संपल्यावर कोणत्याहि सभासदास पुनश्च निवडणुकीस उभें रहाण्याचा हक्क आहे. दर दोन वर्षांनीं एकंदर सभासदांचे एक तृतीयांश सभासद निवृत्त झाले पाहिजेत अशी व्यवस्था केलेली आहे. यासंबंधीं तपशील ठरविण्याचा अधिकार पार्लमेंटला दिलेला आहे.

संघराज्याचें मंत्रिमंडळ फक्त लोकसभेला जबाबदार आहे, म्हणजे कौन्सिलचा मंत्रिमंडळावर कोणताहि अधिकार नाहीं. कांहीं विशिष्ट अधिकार अमेरिकन सीनेटला आहेत ते भारताच्या संघराज्याच्या कौन्सिलला दिलेले नाहींत.

## लोकसभा

लोकसभा ही वयांत आलेल्या दरएक स्त्रीपुरुष नागरिकाच्या मतानें निवडलेल्या सभासदांची बनणार. लोकसभेच्या सभासदांची संख्या ५०२ पेक्षां अधिक होऊं शकणार नाहीं. देशाचे प्रादेशिक विभाग पाडून सभासदांच्या जागांची वांटणी करून द्यावयाचा अधिकार पार्लमेंटला दिलेला आहे. ही वांटणी करतांना दोन नियम लक्षांत ठेवले पाहिजेतः ( १ ) साडेसात लाख वस्तीला एकापेक्षां कमी जागा देतां कामा नये, आणि ( २ ) पांच लाख वस्तीला एकापेक्षां अधिक जागा देतां कामा नये. घटनेंतील अनुज्ञेला

अनुसरून हल्लींच्या पार्लमेंटानें एक कायदा पास करून लोकसभतील जागांची घटकवार वांटणी केली आहे. ती वांटणी पुढें दिल्याप्रमाणें आहे.

आसाम १२, बिहार ५५, मुम्बई ४५, मध्यप्रदेश २९, मद्रास ७५, ओरिसा २०, पंजाब १८, उत्तरप्रदेश ८६, बंगाल ३४, हैद्राबाद २५, काश्मीर ६, मध्यभारत ११, पत्याळा व पूर्व पंजाब संस्थानसंघ ५, राजस्थान २०, सौराष्ट्र ६, त्रावणकोर कोचीन १२. या शिवाय सव्वीस जागा संघसरकारच्या ताब्यांत असलेल्या घटकांमध्यें वाटल्या आहेत.

लोकसभेच्या सभासदाचें कमीतकमी वय पंचवीस वर्षें असलें पाहेजे आणि दरएक सभासद हिंदुस्थानचा नागरिक असला पाहिजे.

लोकसभेला एक स्पीकर (अध्यक्ष) आणि एक डेप्युटी स्पीकर (उपाध्यक्ष) निवडण्याचा हक्क आहे. या दोघांनाहि पगार मिळाला पाहिजे.

लोकसभा दर पांच वर्षांनीं बरखास्त झालीच पाहिजे आणि नवीन सभासदांची निवडणूक झालीच पाहिजे. पण जर राष्ट्रपतीची तशी मर्जी असेल तर पांच वर्षांपेक्षां कमी मुदतींत सुद्धां लोकसभा बरखास्त करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. मंत्रीमंडळ लोकसभेला जबाबदार आहे यामुळें ही व्यवस्था करणें भाग पडलें. ही व्यवस्था इंग्लंडच्या घटनेला अनुसरून आहे. फ्रान्स किंवा युनायटेड स्टेट्समध्यें ठराविक मुदत पुरी झाल्याशिवाय सभा बरखास्त करण्याचा कोणालाहि अधिकार नाहीं. ज्याप्रमाणें पांच वर्षांपेक्षां कमी मुदतींत लोकसभा बरखास्त होऊं शकते त्याप्रमाणें आणीबाणीच्या परिस्थितींत लोकसभेचें आयुष्य वाढविण्याचा अधिकार पार्लमेंटला दिलेला आहे. या बाबतींतहि इंग्लंडचाच कित्ता गिरविण्यांत आला आहे. अमेरिकेंतील प्रतिनिधि-सभा दर दोन वर्षांनीं बरखास्त होते. तसेंच फ्रान्सचें पार्लमेंटहि ठराविक मुदतीनंतर बरखास्त होतें आणि नव्या निवडणुकी लांबणीवर टाकण्याचा अधिकार तेथील पार्लमेंटाला दिलेला नाहीं.

## राखीव जागा

लोकसभेमध्यें हरिजन व आदिवासी यांच्यासाठीं जागा राखून ठेवलेल्या आहेत. तसेंच अँग्लो-इंडियनांचे पुरेसे प्रतिनिधि निवडणुकीच्या दरवाजांतून

लोकसभेंत येऊं शकले नाहींत तर एक किंवा दोन अँग्लोइंडियन सभासद नेमण्याचा अधिकार राष्ट्रपतीस देण्यांत आला आहे. घटनेनें ठरविलेल्या पांचशें सभासदांच्या मर्यादेबाहेर हे सभासद असणार, म्हणूनच लोकसभेची कमाल संख्या ५०२ होऊं शकेल असें वर सांगितलेलें आहे.

१९३५ च्या कायद्यांत धर्मवार प्रतिनिधि निवडण्याची व्यवस्था होती ती आपल्या नव्या घटनेंत रद्द करून टाकली आहे. आतां निरनिराळे मतदारसंघ नाहींत, प्रादेशिक विभागासाठीं मतदारांची एकच यादी तयार करण्यांत येईल. या बाबतींत शंकेला यत्किंचित जागा राहूं नये म्हणून कलम ३२५ घटनेंत घालून स्पष्ट खुलासा केलेला आहे. पण दहा वर्षेंपर्यंत हरिजन व आदिवासी आणि अँग्लोइंडियन यांचेकरितां राखीव जागांची तरतूद केलेली आहे इतकेंच. दहा वर्षांनी हेंहि गालबोट जाईल.

## पार्लमेंटचे अधिकार

लोकसभा आणि कौन्सिल या दोनहि सभांचीं कमीतकमी दोन अधिवेशनें प्रतिवर्षी भरलींच पाहिजेत. आणि कोणच्याहि दोन अधिवेशनांमध्यें सहा महिन्यांची मुदत जातां कामा नये.

पार्लमेंटच्या या दोन सभांमध्यें जसा सभासदांच्या निवडणुकींसंबंधीं आणि मुदतीसंबंधीं फरक आहे तसाच त्यांच्या अधिकाराच्या बाबतींत फरक आहे. कांहीं महत्त्वाचे फरक या ठिकाणी टांचण्यांत येत आहेत.

( १ ) लोकसभेला आपला अध्यक्ष ( स्पीकर ) निवडण्याचा व काढून टाकण्याचा हक्क आहे. कौन्सिलचा अध्यक्ष निवडण्याचा अगर काढून टाकण्याचा अधिकार पार्लमेंटच्या दोन सभांना मिळून आहे. लोकसभेचा अध्यक्ष त्या सभेचा सभासद असला पाहिजे. कौन्सिलचा अध्यक्ष त्या सभेचा सभासद असतां कामा नये, इतकेंच नव्हे तर निवडणुकीच्या पूर्वी तो कौन्सिलचा सभासद असला तर अध्यक्ष म्हणून निवडल्याबरोबर त्याचें सभासदत्व रद्द होतें.

( २ ) मंत्रिमंडळ फक्त लोकसभेलाच जबाबदार आहे.

( ३ ) बजेटवर ( जमाखर्चावर ) फक्त लोकसभेचाच अधिकार आहे. नवे कर लादण्यासंबंधीं किंवा चालू असलेल्या करांत फरक करण्यासंबंधीं जे कायदे करावे लागतात त्यांचें पहिलें वाचन लोकसभेंत करावें लागतें. इतकेंच नव्हे तर अशा प्रकारचे कायदे करण्यासंबंधीं कौन्सिलचा अधिकार फारच मर्यादित आहे. लोकसभेनें मंजुर केलेलें बिल फक्त विचाराकरितां कौन्सिलकडे पाठवायाचें अशी अनुज्ञा आहे. जर कांहीं दुरुस्त्या व्हाव्या असें कौन्सिलला वाटेल तर तशा शिफारशी करण्याचा अधिकार तेवढा कौन्सिलला आहे. पण त्या शिफारशी मान्य करणें न करणें पूर्णपणें लोकसभेच्या निरंकुश इच्छेवर अवलंबून आहे. खर्चाला मंजुरी देण्याचा अधिकार फक्त लोकसभेला ही व्यवस्था इंग्लंडमधील पद्धतीला धरून केलेली आहे. तिजोरीचा ताबा आणि मंत्रिमंडळावर हुकमत या दोन गोष्टी हाऊस ऑफ कॉमन्सकडे असल्यामुळें त्याला ( सॉव्हरीन ) वरिष्ठ अधिकारी संस्था म्हणण्याची प्रथा पडली आहे. हाऊस ऑफ कॉमन्सचा दर्जा आपल्या लोकसभेला पूर्णपणें देतां येत नाहीं; पण शक्य तोंवर तसें करण्याचा प्रयत्न आपल्या घटनापंडितांनीं केलेला आहे.

## सभासदांचे हक्क व सवलती

पार्लमेंटच्या सभागृहांत सभासदांना पूर्ण भाषणस्वातंत्र्य आहे. तेथें केलल्या भाषणाबद्दल अगर दिलेल्या मताबद्दल कोणत्याहि कोर्टात काम चालणार नाहीं. आणखीहि कांहीं खास हक्क आणि सवलती सभासदांना असतात. पार्लमेंटच्या सभासदांना पगार व भत्ता मिळण्याची व्यवस्था केलेली आहे.

पार्लमेंटच्या दोनहि सभांना आपापले कामकाजाचे नियम करण्याचा अधिकार आहे. आपल्या पार्लमेंटचें कामकाज इंग्रजी आणि हिंदी भाषेंत चालणार. पंधरा वर्षेपर्यंत पार्लमेंटचें छापी काम इंग्रजी भाषेंत चालणार पण एखाद्या सभासदास इंग्रजी अगर हिंदी नीट बोलतां येत नसेल तर त्याला आपल्या भाषेंत बोलण्याचा हक्क आहे.

पार्लमेंटमध्यें स्वायत्तता असावी म्हणून अशी व्यवस्था केलेली आहे कीं सभागृहांत शांतता राखण्याचा अधिकार दरएक सभेला आहे. सभेच्या वतीनें या कामासाठीं नेमलेले अधिकारी सभेला जबाबदार राहतील, त्यांच्यावर कायद्याच्या कोर्टाची हुकमत चालणार नाहीं. या स्वायत्ततेची व्याप्ति जसजसे प्रसंग घडतील तसतशी स्पष्ट होईल.

## तात्पुरतें पार्लमेंट

सध्यां हिंदुस्थानच्या पार्लमेंटाची एकच सभा आहे. आपली घटना बनविणारी जी समिति होती तिचेंच रूपांतर हिंदुस्थानच्या पहिल्या पार्लमेंटांत झालें आहे. कांहीं व्यक्ति बदलल्या असतील इतकेंच. नव्या निवडणुकी होऊन रीतसर दोन सभांचे सभासद निवडले जातील त्यावेळीं घटनेप्रमाणें पार्लमेंट अस्तित्वांत येईल. तोंपर्यंत हें तात्पुरतें पार्लमेंटच कायदे करण्याचें व कर बसवण्याचें काम करणार.

## कायदा कसा होतो

कायदा करावयाचा झाला म्हणजे त्याचा मसुदा (अगर बिल) कोणत्या तरी एका सभेपुढें ठेवावा लागतो. साधारणपणें कोणत्याहि सभेपुढें हा मसुदा ठेवतां येतो. निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे सुरुवात कोणत्याहि सभेंत करता येते. पण पैशासंबंधींचें बिल असेल तर मात्र त्याची सुरुवात लोकसभेंतच करावी लागते. कोणतेंहि बिल दोनहि सभांनीं मान्य केल्याशिवाय तें पास झालें असें म्हणता येत नाहीं. दोन सभांमध्यें मतभेद झाल्यास दोनहि सभांची संयुक्त बैठक भरली पाहिजे. संयुक्त बैठकीचें अध्यक्षस्थान लोकसभेच्या अध्यक्षानें मंडित करावयाचें आहे. संयुक्त बैठकींत हजर राहून मत देणाऱ्या सभासदांपैकीं बहुसंख्येचा जो निर्णय तो दोनहि सभांचा निर्णय म्हणून मानण्यांत आला पाहिजे. पैशासंबंधीं बिल असेल तर तें लोकसभेपुढेंच प्रथम मांडलें पाहिजे आणि लोकसभेचेंच मत अशा बिलासंबंधीं निर्णायक आहे हें वर सांगितलेंच आहे.

ज्या सभेंत बिल प्रथम माडलें जातें त्या सभेंत तें तीन वेळां वाचलें जातें. तिसरें वाचन मंजूर झालें म्हणजे त्या सभेंत तें मंजूर झालें असें समजावयाचें. एका सभेंतून पास होऊन दुसऱ्या सभेंत बिल गेलें म्हणजे त्या दुसऱ्या सभेंत तें तीन वेळा वाचलं गेलें पाहिजे असें नाहीं.

दोनहि सभांनीं मंजूर केलेलें बिल राष्ट्रपतीकडे मंजुरीसाठीं पाठवावें लागतं. राष्ट्रपति पार्लमेंटचें एक अंग आहे. पैशासंबंधींचें बिल असेल तर राष्ट्रपतीनें त्याच्यावर ताबडतोब सही केली पाहिजे. इतर कोणत्याही बाबीसंबंधीं बिल असेल तर एकदां फेरविचार करण्यासाठीं तें परत पाठविण्याचा अधिकार

राष्ट्रपतीस आहे. पण फेरविचार करून पार्लमेंटच्या सभागृहांकडून फिरून तें बिल आलें म्हणजे त्याच्यावर संमति दाखवणारी सही राष्ट्रपतीनें केलीच पाहिजे. राष्ट्रपतीची सही झाली म्हणजे बिलाला किंवा मसुद्याला कायद्याचें स्वरूप येतें.

## मंत्री आणि मंत्रिमंडळें

मंत्रीमंडळें कशीं नेमावीं यासंबंधीं घटनेंत नियम घालून दिलेले आहेत आणि ते संघराज्याला व घटकराज्यांना सारखेच लागू आहेत. राष्ट्रपति, गव्हर्नर किंवा राजप्रमुख यांनी फक्त मुख्य मंत्री नेमावयाचा आणि बाकीचे मंत्री मुख्य मंत्र्याच्या सांगण्याप्रमाणें नेमावयाचे. शिवाय मंत्रिमंडळ सामवायिक रीतीनें लोकसभेला जबाबदार असल्यामुळें, लोकसभेंत ज्या पक्षाचें मताधिक्य असेल त्या पक्षाच्या पुढाऱ्याशिवाय कुणालाहि राष्ट्रपति, गव्हर्नर किंवा राजप्रमुख मुख्य मंत्री म्हणून नेमूं शकणारच नाहीं. सर्व मंत्री संघराज्यांत पार्लमेंटाचे आणि घटकराज्यांत कायदेमंडळाचे सभासद असले पाहिजेत. याला अपवाद असा ठेविला आहे की पार्लमटच्या किंवा कायदेमंडळाचा सभासद नसलेल्या नागरिकाला सहा महिन्यांपर्यंत मंत्री म्हणून नेमतां येईल. मंत्र्यांच्या जागा पगारी आहेत. त्यांचे पगार अनुक्रमें पार्लमेंट व कायदेमंडळें कायदे करून ठरविणार. राष्ट्रपति, गव्हर्नर आणि राजप्रमुख यांचे मंत्रीमंडळाशीं असलेले संबंध खाजगी म्हणजे गुप्त स्वरूपाचे असल्यामुळें मंत्रिमंडळांनें कोणत्याहि कामीं काय सल्ला दिला याची चौकशी कायद्याच्या कोर्टात करतां येणार नाहीं.

## वटहुकूम

पार्लमेंटचें अधिवेशन चालू नसतांना जर नवीन कायदा करण्याची अवश्यकता मंत्रिमंडळास वाटली तर जरूर तो कायदा ऑर्डिनन्सच्या स्वरूपांत जाहीर करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. आर्डिनन्सचा अंमल अल्पकालीन असतो. ऑर्डिनन्स काढल्यानंतर पार्लमेंटाचें जें पहिलें अधिवेशन भरेल त्यांत तें ऑर्डिनन्स पार्लमेंटापुढें ठेवलें पाहिजे आणि अधिवेशनाच्या सुरवातीपासून सहा आठवडेपर्यंतच त्याचा अंमल चालू राहील. ही मुदत कमी करण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे. ऑर्डिनन्स केव्हांहि रद्द करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे.

# भाग सहावा

# घटकराज्यें

भारताच्या नव्या राज्यघटनेंत घटकांना मर्यादित कां होईना स्वतंत्र स्थान देण्यांत आलें आहे हें यापूर्वींच्या भागांत स्पष्ट केलेलें आहे. या घटकांबद्दल व्यवस्था घटनाकायद्याच्या सहाव्या व सातव्या भागांत दिलेली आहे.

१

## गव्हर्नर आणि राजप्रमुख

संघराज्याचें सरकार म्हणजे राष्ट्रपति आणि त्याचें मंत्रिमंडळ. घटकराज्यांत जवळ जवळ तशीच व्यवस्था आहे म्हटलें तरी चालेल. दरएक घटकराज्यावर एक शासक असावयाचा. कांही घटकांत त्याला गव्हर्नर म्हणण्यांत येईल आणि कांहीं घटकांत त्याला राजप्रमुख म्हणण्यांत येईल. गेल्या वर्षापर्यंत ज्या प्रदेशांना प्रांत अशी संज्ञा होती त्यांच्या शासकांना गव्हर्नर म्हणण्यांत येईल. अशा घटकांची स्वतंत्र यादी करून त्यांना अ वर्ग देण्यांत आला आहे. ज्या प्रदेशांना देशी संस्थानें म्हणत असत त्यांना ब वर्ग देण्यांत आला आहे. पूर्वीं पांचशेंवर संस्थानें होती त्यांचे गट करून आतां ब वर्गात फक्त आठ संस्थानें ठेवण्यांत आलीं आहेत. आणि यांपैकी दर एकाच्या शासकाला राजप्रमुख म्हणण्यांत येईल. या दोन प्रकारच्या शासकांमध्यें कांहीं महत्त्वाचे फरक आहेत आणि त्याला ऐतिहासिक कारणें आहेत. गव्हर्नराची नेमणूक राष्ट्रपतीकडून व्हावयाची असून त्याला केव्हांहि बडतर्फ करण्याचा अधिकार राष्ट्रपतीला आहे. अमेरिकेंत अशी पद्धत नाहीं हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें. 'अ' वर्गांतील संस्थानांत वास करीत असलेला संघराज्याचा प्रतिनिधि अगर बडा अंमलदार असें गव्हर्नराचें वर्णन करावयास हरकत नाहीं. राजप्रमुख कसा निवडला जावा यासंबंधीं व्यवस्था घटनेच्या कायद्यांत नाहीं; ती अन्य ठिकाणीं नमूद केलेली आहे. मुख्य फरक लक्षांत ठेवावयाचा तो हा कीं गव्हर्नर नेमला जातो (is appointed) आणि राजप्रमुख होतो (becomes).

## दोन शासकांतील फरक

गव्हर्नर केव्हाहि बडतर्फ करतां येतो, कारण राष्ट्रपति त्याला नेमतो. राजप्रमुखाला बडतर्फ करण्याची योजना घटनेच्या कायद्यांत कोठेंहि नाहीं, त्यासंबंधीची योजना अन्य ठिकाणीं नमूद केलेली आहे. दोन जातीच्या शासकांमध्यें याशिवाय जो फरक आहे तो कलम १५८ पोटकलम ३ आणि कलम २३८ यांची छाननी केल्यास लक्षांत येईल. गव्हरनरला अनेक संरकारी घरांचा ( ऑफिशिअल रेसिडेन्सेस ) उपयोग मिळाला पाहिजे. पण राजप्रमुखाला एका सरकारी घराचा (अॅन ऑफिशिअल रेसिडन्स) उपभोग मिळाला पाहिजे. गव्हर्नरला पगार मिळेल, राजप्रमुखाला पगार नाहीं. गव्हर्नरला आणखी भत्ता व दुसऱ्या सवलती किती व कशा मिळाव्या हें घटकराज्याचें कायदेमंडळ ठरविणार. राजप्रमुखाचा भत्ता वगैरे किती असावा हें राष्ट्रपति ठरविणार.

## २
## मंत्रिमंडळ

घटकराज्याचा कारभार गव्हर्नर किंवा राजप्रमुख याच्या नावानें चालणार. पण गव्हर्नर काय किंवा राजप्रमुख काय यांना स्वतःचा असा अधिकार मुळीच नाहीं असें म्हणतां येईल. दर एक घटकराज्याचें एक मंत्रिमंडळ असणार आणि या मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणें गव्हर्नर किंवा राजप्रमुख याला कारभार करावा लागणार. हें मंत्रिमंडळ घटकराज्यांतील लोकसभेला जबाबदार रहाणार. मंत्रिमंडळाचा सल्ला न घेतां किंवा झुगारून गव्हर्नरला किंवा राजप्रमुखाला कांहीं गोष्टी करण्याचा अधिकार दिलेला आहे. पण त्या गोष्टी करतांना तो राष्ट्रपतीला जबाबदार रहावयाचा आहे. कांही गोष्टी अशा आहेत कीं त्या करण्याचे हुकूम गव्हर्नराला किंवा राजप्रमुखाला पाठविण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. ज्या घटनेंत घटक राज्याचा दर्जा गौण आहे तेथें शासकाचा दर्जा यापेक्षां वरचा कसा असूं शकेल ?

## ३
## कायदेमंडळ

हिंदुस्थानाच्या नव्या राज्यघटनेप्रमाणें संघराज्य अस्तित्वांत आलें असल्यामुळें संघराज्य आणि घटकराज्यें यांसाठीं कायदे करण्यास अधिकारी

असलेल्या निरनिराळ्या संस्थांची योजना घटनेंत करावी लागली आहे. इंग्लंडमध्यें फक्त पार्लमेंटला सर्व कायदे करण्याचा अधिकार आहे. फ्रान्स-मध्येंहि घटनेंतील मूलभूत तत्त्वांना बाध न आणतां सर्व कायदे करण्याचा अधिकार नॅशनल ॲसेंब्लीला दिलेला आहे. साउथ ॲफ्रिकन यूनियनमध्येहि कायदे करण्याचा सर्व अधिकार जोहॅन्सबर्गच्या पार्लमेंटला आहे. पण अमेरिका, कानडा व ऑस्ट्रेलिया या देशांच्या घटनेप्रमाणें संघसरकार आणि घटक सरकारें या दोघांमध्यें कायदे करण्याचा अधिकार विभागलेला आहे. हिंदुस्थानच्या घटनाकायद्यांतहि अशीच विभागणी केलेली आहे आणि म्हणून कायदे करणाऱ्या अधिकारी संस्थाहि संघाला आणि दरएक घटकाला दिलेल्या आहेत.

दरएक घटकराज्यांत एक एक कायदेमंडळ असावें अशी व्यवस्था घटनेच्या कायद्यांत केली आहे. घटकाच्या कायदेमंडळास पार्लमेंट हें नांव नाहीं. **अ** वर्गांत नऊ घटक राज्यें असून **ब** वर्गांत आठ आहेत. यांपैकीं **अ** वर्गांतील सहा आणि **ब** वर्गांतील एक मिळून सात घटकराज्यांत कायदे-मंडळाच्या दोन सभा असावयाच्या आणि बाकीच्या राज्यांत म्हणजेच संस्थानांत एक सभा असावयाची. ज्या घटकांत दोन सभा असावयाच्या त्यांत कायदेमंडळ याचा अर्थः

(१) गव्हर्नर अगर राजप्रमुख
(२) कौन्सिल
(३) लोकसभा.

ज्या घटकांत एकच सभा असावयाची त्यांत कायदेमंडळ म्हणजे—

(१) गव्हर्नर अगर राजप्रमुख
(२) लोक सभा.

पार्लमेंटानें नुकताच जो कायदा पास केला आहे त्या प्रमाणें दरएक घटकाच्या लोकसभेच्या सभासदांची जी संख्या ठरली आहे ती अशी आहे :

आसाम १०८, बिहार ३३०, मुंबई ३१५, मध्यप्रदेश २३२, मद्रास ३७५, ओरिसा १४०, पंजाब १२६, उत्तर प्रदेश ४३०, बंगाल २३८, हैद्राबाद १७५, मध्यभारत ९९, म्हैसूर ९९, पत्याळा व पूर्वपंजाब संस्थान संघ ६०, राजस्थान १६०, सौराष्ट्र ६०, त्रावणकोर कोचीन १०८.

त्याच कायद्याप्रमाणें कौन्सिलांच्या सभासदांची संख्या ठरली आहे ती अशी आहे:

बिहार, मुंबई, मद्रास, उत्तरप्रदेश, प्रत्येकीं ७२, बंगाल ५१, पंजाब ४०, म्हैसूर, ४०.

लोकसभेचे सर्व सभासद वयांत आलेल्या सर्व स्त्रीपुरुष नागरिकांनीं प्रत्यक्ष मतें देऊन निवडलेले असणार. लोकसभेंत कांहीं जागा हरिजन व आदिवासी यांच्यासाठीं राखून ठेवलेल्या आहेत. यांशिवाय ॲंग्लो-इंडियनांसाठीं कांहीं जागा निर्माण करून त्या जागांसाठीं त्यांचे प्रतिनिधि नेमण्याचा अधिकार गव्हर्नर व राजप्रमुख यांस दिलेला आहे. या जादा जागा समजल्या जातील.

## सभासदांचे प्रकार व लायकी

कौंसिलमध्यें एकंदर पांच प्रकारें सभासद येऊं शकतात.

(१) म्युनिसिपालिट्या, लोकल बोर्ड आणि इतर स्थानिक स्वराज्यसंस्था यांच्या सभासदांनीं एक तृतीयांश सभासद निवडावयाचे;

(२) घटकराज्यांत रहाणाऱ्या पदवीधरांनीं एक बारांश सभासद निवडावयाचे;

(३) घटकराज्यांतील प्राथमिक शाळांखेरीज इतर शाळांतील शिक्षकांनीं एक बारांश सभासद निवडावयाचे;

(४) लोकसभेनें एक तृतीयांश सभासद निवडावयाचे;

(५) उरलेले सभासद गव्हर्नरनें नेमावयाचे.

कौन्सिल ही सभा कधीं बरखास्त व्हावयाची नाहीं. त्यांतील एक तृतीयांश सभासदांच्या जागा दर दोन वर्षांनीं रिकाम्या होतील आणि तेवढ्या जागा भरण्यासाठीं निवडणुकी अगर नेमणुका होतील. कौन्सिलचा दरएक सभासद हिंदुस्थानचा नागरिक असला पाहिजे आणि त्याचें कमीतकमी वय तीस वर्षें असलें पाहिजे.

लोकसभा दर पांच वर्षांनीं बरखास्त झालीच पाहिजे. पण पांच वर्षांपेक्षां कमी मुदतींत सुद्धां लोकसभा बरखास्त करण्याचा अधिकार गव्हर्नर व

राजप्रमुख यांस आहे. लोकसभेचा दरएक सभासद हिंदुस्थानचा नागरिक असलाच पाहिजे आणि त्याचें वय कमीत कमी पंचवीस वर्षे असलें पाहिजे.

कौन्सिलनें आपल्या सभासदांपैकीं एक अध्यक्ष आणि एक उपाध्यक्ष निवडला पाहिजे. लोकसभेनेंहि आपल्या सभासदांपैकीं एक स्पीकर ( अध्यक्ष ) आणि एक डेप्युटी स्पीकर ( उपाध्यक्ष ) निवडला पाहिजे. या सर्वांना पगार मिळाला पाहिजे आणि तो ठरवण्याचा अधिकार कायदेमंडळाचा आहे. लोकसभेच्या व कौन्सिलच्या सभासदांसहि पगार व भत्ता मिळाला पाहिजे आणि तो ठरवण्याचा अधिकार कायदेमंडळास आहे.

पार्लमेंटच्या सभासदांप्रमाणें घटकांतील कायदेमंडळांच्या सभासदांना सभांमध्यें पूर्ण भाषणस्वातंत्र्य आहे.

घटकराज्याचें मंत्रिमंडळ फक्त लोकसभेला जबाबदार आहे; म्हणजे कौन्सिलचा मंत्रिमंडळावर कोणत्याहि प्रकारचा अधिकार नाहीं. घटनेच्या कायद्यांत सात घटकांमध्यें कौन्सिलची योजना केली आहे. पण तीं सर्वच्या सर्व नष्ट करण्याचा अधिकार पार्लमेंटास दिलेला आहे. नवीन कौन्सिलें निर्माण करण्याचाहि अधिकार पार्लमेंटास दिलेला आहे.

लोकसभा व कौन्सिल यांचे संबंध पार्लमेंटांतील लोकसभा व कौन्सिल यांच्या संबंधासारखे आहेत. पैशाचे सर्व प्रश्न पूर्णपणें लोकसभेच्या अखत्यारांत आहेत. संघराज्याच्या कौन्सिलचा अधिकार व दर्जा आणि घटकांतील कौन्सिलचा अधिकार व दर्जा यांत फार फरक आहे. घटक राज्यांतील कौन्सिल ही शोभेची बाहुली आहे, मात्र तिच्यावर जरीची झूल घातलेली आहे. कोणताहि स्वाभिमानी माणूस, ज्याच्या वेळाला थोडी तरी किंमत आहे असा कोणताहि माणूस, घटकराज्यांतील कौन्सिलचा सभासद होईल असें वाटत नाहीं. घटक राज्यांतील कौन्सिल ही महागडी चैन सुद्धां नव्हे तर महागडी अडगळ आहे. त्यांच्यासाठीं खर्च होणारा पैसा समुद्रांत किंवा गटारांत फेकल्यासारखा आहे. त्यांच्यासाठीं घटनेच्या कायद्याच्या पुस्तकांत जे शब्द खर्ची घातले आहेत आणि ते छापण्यापायीं जो कागद खर्ची पडला आहे आणि पडणार आहे— हा सर्व खर्च अगदीं व्यर्थ आहे.

घटकाच्या कायदेमंडळांत कायदा करण्यासाठीं काय करावें लागतें आणि खर्चाला मंजुरी मिळवण्यासाठीं काय करावें लागतें, तसेंच लोकसभा व कौन्सिल यांमध्यें मतभेद झाल्यास काय करावें हें १९६ ते २१२ या कलमांत सांगितलेलें आहे. या बाबतींत संघाच्या आणि घटकाच्या नियमावलींत फारच अल्प फरक आहे. लोकसभेच्या निर्णयाला जर कौन्सिलनें संमति दिली नाहीं तर त्या नापसंतीचा फक्त विचार करण्याची जबाबदारी लोकसभेवर आहे. विचार केल्यानंतर कौन्सिलनें सुचवलेल्या दुरुस्त्या पाहिजे तर मान्य करण्याचा अगर कचऱ्याच्या टोपलींत टाकण्याचा लोकसभेस पूर्ण अखत्यार आहे. पैशासंबंधींचें बिल चौदा दिवस आणि इतर बिलें तीन महिने रखडवणें एवढेंच कौन्सिलच्या अखत्यारांत आहे.

पार्लमेंटाच्या दोनहि सभागृहांनीं पास केलेल्या बिलाला जशी राष्ट्रपतीची संमति मिळावी लागते तशीच घटकाच्या कायदेमंडळाच्या सभागृहांनीं पास केलेल्या बिलाला गव्हर्नर वा राजप्रमुख याची संमति लागते. या बाबतींत राष्ट्रपति आणि घटकाचा शासक यांच्यामध्यें फरक अगदीं थोडा आहे. कांहीं कायदे असे आहेत कीं त्यांसंबंधींच्या बिलांना स्वतः संमति न देतां राष्ट्रपतीकडे तीं संमतीसाठीं पाठवतां येतात. अशा एका विशिष्ट प्रकाराचा उल्लेख कलम २०० मध्यें आहे. घटकाच्या कायदेमंडळाच्या सभांनीं हायकोर्टाच्या कार्यक्षमतेला धोका आणणारें बिल पास केलें तर त्याला गव्हर्नरनें वा राजप्रमुखानें स्वतः संमति न देतां तें बिल राष्ट्रपतीकडे पाठविलें पाहिजे असें त्या कलमांत सांगितलें आहे. एवढा फरक वजा केल्यास पार्लमेंटच्या सभा व राष्ट्रपति यांचा जो संबंध तोच कायदा घडवण्याच्या बाबीपुरता घटकांतील कायदेमंडळाच्या सभा व गव्हर्नर वा राजप्रमुख यांचा आहे.

## वटहुकूम

आणीबाणीच्यावेळीं ऑर्डिनन्स (वटहुकूम) जारी करण्याचा अधिकार गव्हर्नर वा राजप्रमुख यास आहे. जे नियय संघाच्या वटहुकूमास लागू आहेत ते घटकाच्या वटहुकूमासहि लागू आहेत.

# भाग सातवा

# न्यायालयें

न्यायकोर्टाचें स्वतंत्र प्रकरण १९३५ च्या कायद्यांत होतें पण आपल्या नव्या म्हणजे स्वतंत्र भारताच्या घटनाकायद्यांत स्वतंत्र प्रकरण नाहीं. या लेखकाच्या दृष्टीनें न्यायकोर्टाबद्दलची माहिती स्वतंत्रपणें एकत्रित करून देणें अवश्य आहे, म्हणून हा भाग त्या विषयाला दिला आहे. आपल्या घटना-कायद्यांत सातवा भाग 'ब'वर्गातील घटकांना दिलेला आहे. 'ब'वर्गातील घटकांच्या व्यवस्थेची माहिती या पुस्तकाच्या सहाव्या भागांत येऊन गेली आहे हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल.

दरएक लिखित घटनेंत आणि त्यांतहि कमी अधिक प्रमाणांत सामवायिक (फेडरल) स्वरूपाच्या घटनेंत न्यायकोर्टाचें स्थान अतिशय महत्त्वाचें असतें. जनतेच्या वतीनें घटनेच्या कायद्याचा अचूक अर्थ करणें आणि घटनेनें निर्माण केलेले निरनिराळे अधिकारी घटनेच्या कायद्यांत नमूद केलेले यमनियम पाळतात किंवा नाहीं हें पहाणें हीं कामें करण्याचा अधिकार न्यायकोर्टाचा आहे. एका सुप्रसिद्ध अमेरिकन तज्ज्ञानें संघराज्यांतील वरिष्ठ न्यायकोर्टाचें वर्णन इंटरप्रेटर ॲंड गार्डिअन ऑफ दि कॉन्स्टिटयूशन या शब्दांनीं केलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. घटकांच्या अदालती आणि संघाच्या अदालती असा फरक १९३५ च्या कायद्यांत नव्हता. आपल्या स्वतंत्रराज्यघटनेच्या कायद्यांत तसा फरक केला आहे. सुप्रीम कोर्टासंबंधींची व्यवस्था संघराज्याच्या प्रकरणांत एक पोट प्रकरण म्हणून दिली आहे, आणि घटकांतील हायकोर्टासंबंधींची व्यवस्था घटकांच्या प्रकरणांत एक पोट प्रकरण म्हणून दिली आहे. या लेखकाच्या मतें १९३५ च्या कायद्यांतील व्यवस्था जास्त स्पृहणीय होती. सर्व कायद्यांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी सर्व कोर्टावर आहे अशी भूमिका १९३५ च्या कायद्यांत स्वीकारलेली होती आणि ती योग्य होती. आतांच्या कायद्यानें कलम २४७ मध्यें अशी व्यवस्था फर्मावली आहे कीं केवळ संघसरकारच्या क्षेत्रांतील

कायद्यांची अंमलबजावणी करण्यासाठीं स्वतंत्र कोर्ट पार्लमेंट स्थापन करूं शकेल. या कलमांत ज्या वृत्तीचें आविष्करण झालें आहे तीच वृत्ति संघाच्या अदालती आणि घटकांच्या अदालती वेगवेगळ्या भागांत देण्याच्या मुळाशीं आहे. अमेरिकन घटनेंत जितकें वरिष्ठस्थान कोर्टांना दिलेलें आहे तितकें हिंदी राज्यघटनेंत दिलेलें नाहीं असें जें म्हणण्यांत येतें त्याचेंहि कारण हीच वृत्ति व तिचें केलेलें आविष्करण.

घटनेच्या कायद्यांत ग्रथित केलेली संघसरकारची अदालत ह्मणजे वरिष्ठ (सुप्रीम) कोर्ट. घटनेच्या सबंध कायद्यांत 'सुप्रीम' हें विशेषण दुसऱ्या कोणालाहि लावलेलें नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. १९३५ च्या कायद्यांत 'फेडरल कोर्ट' हा शब्द वापरलेला होता. तो डोळ्यापुढें असून आपल्या घटनाकायद्यांत 'सुप्रीम' हा शब्द वापरलेला आहे. वरिष्ठ या विशेषणांत जसा **तमभाव** दाखविला जातो तसाच 'सुप्रीम' या विशेपणांत उच्चतम अधिकाराचा समावेश आहे. इंग्लंडमध्यें पार्लमेंट सर्वाधिकारी आहे. हिंदुस्थानच्या राज्यघटनेंत पार्लमेंट सर्वाधिकारी नाहीं, आणि, ह्मणूनच कीं काय 'सुप्रीम' हें विशेषण पार्लमेंटाला लाविलेलें नाहीं.

## सुप्रीम (वरिष्ठ) कोर्ट

सुप्रीम कोर्टात एक मुख्य न्यायाधीश असून अन्य न्यायाधीशहि आहेत. मुख्य न्यायाधिशास भारताचे मुख्य न्यायाधीश ही पदवी आहे. इतर न्यायाधिशांची संख्या सातांपेक्षां अधिक असूं नये अशी घटनाकायद्यांत मर्यादा आहे, पण ही मर्यादा ओलांडण्याचा अधिकार पार्लमेंटास दिलेला आहे. सुप्रीम कोर्टाचें काम दिल्लींत चाललें पाहिजे. पण मुख्य न्यायाधिशास वाटलें तर राष्ट्रपतीच्या संमतीनें अन्य ठिकाणीं सुद्धां हें कोर्ट भरूं शकेल.

सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधिशांची नेमणूक करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. पांसष्ट वर्षें पुरीं झालीं म्हणजे दरएक न्यायाधिशास सेवानिवृत्त होणें भाग आहे. त्यापूर्वी कोणीहि न्यायाधीश स्वखुषीनें सेवानिवृत्त होऊं शकेल. जर पार्लमेंटाच्या दोनहि सभांनीं एकाद्या न्यायाधिशास काढून टाकावें असा ठराव दोन तृतीयांश बहुमतानें पास करून राष्ट्रपतीकडे पाठवला तर त्या न्याया-

धिशास काढून टाकण्यांत येईल. एरवी कोणत्याहि न्यायाधिशास पासष्ट वर्षे पुरीं होईपर्यंत कामावरून दूर करतां येणार नाहीं. सुप्रीम कोर्टाच्या न्याया-धिशास कोणत्याहि व्यक्तीचा मुलाहिजा ठेवण्याचें कारण पडूं नये आणि त्यानें आपलें काम निश्चितपणें आपल्या सदसद्विवेकबुद्धीस स्मरून करावें एवढ्या हेतूनें ही व्यवस्था घटनेच्या कायद्यांत नमूद केलेली आहे. या व्यवस्थेंत फरक करण्याचा अधिकार पार्लमेंटास दिलेला नाहीं. सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधिशांचा पगारहि घटनेच्या कायद्यानेंच ठरविला आहे. सर न्यायाधिशाचा पगार दरमहा रु. ५००० आणि इतर न्यायाधिशांस दरमहा रु. ४००० मिळेल. पगाराशिवाय भत्ता व इतर हक्क नी सवलती पार्लमेंट ठरवील त्याप्रमाणें मिळतील. पूर्वीच्या कायद्यांत नसलेलें एक महत्त्वाचें कलम आपल्या नव्या घटनेच्या कायद्यांत घातलेलें आहे तें असें कीं सेवानिवृत्त न्यायाधिशास भारतांतील कोणत्याहि कोर्टांत अगर कोणत्याहि अधिकाऱ्यापुढें वकिली करतां येणार नाहीं.

सुप्रीम कोर्टाचा अधिकार भारताच्या सर्व प्रदेशांत चालेल. आणि सर्व मुलकी व न्यायखात्यांतील अधिकाऱ्यांनीं सुप्रीम कोर्टाला मदत केली पाहिजे.

सुप्रीम कोर्टानें कायद्याचा जो अर्थ केला असेल तो हिंदुस्थानांतील सर्व कोर्टांनीं मानलाच पाहिजे.

सुप्रीम कोर्टाचा अधिकार अनेक प्रकारचा आहे. संघ आणि घटक यांच्या-मध्यें कांहीं कायदेशीर तंटा असेल किंवा घटक घटकांमध्यें तसाच कांहीं तंटा असेल, किंवा एका बाजूस संघ आणि कांहीं घटक व दुसऱ्या बाजूस एक किंवा अनेक घटक यांच्यामध्यें तसाच एकादा तंटा असेल तर अव्वलपासून त्याची चौकशी करण्याचा अधिकार एकट्या सुप्रीम कोर्टास आहे. जुनीं देशीसंस्थानें (ज्यांना आतां ब वर्गांतील संस्थानें म्हटलेलीं आहेत) आणि संघराज्य यांच्या दरम्यान जे करारनामे अगर तह झालेले असतील त्यांच्या-संबंधीं कांहीं वाद असेल तर त्या वादाची चौकशी करण्याचा अधिकार सुप्रीम कोर्टाला नाहीं.

घटकांतील हायकोर्टाच्या निकालावर सुप्रीम कोर्टाकडे अपील करतां येईल आणि त्या अपिलांची चौकशी करून हायकोर्टाचे निकाल बदलण्याचा अगर

रद्द करण्याचा अधिकार सुप्रीम कोर्टाला आहे. याशिवाय लष्करी कोर्टाखेरीज कोणत्याहि कोर्टाच्या अगर न्यायालयाच्या निर्णयाविरुद्ध सुप्रीम कोर्टाच्या खास मंजुरीनें सुप्रीम कोर्टापुढें अपील दाखल करतां येईल. हा जो अधिकार आहे तो विलायतेंतील प्रिव्हिकौन्सिलचा अधिकार आहे, पण प्रिव्हिकौन्सिलच्या अधिकाराइतका व्यापक नाहीं, कारण लष्करी कोर्टाच्या निकालाविरुद्ध अपील ऐकण्याचा अधिकार प्रिव्हि कौन्सिलला आहे.

सर्वसाधारण जनतेच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा असा सुप्रीम कोर्टाचा अधिकार कलम ३२ मध्यें नमूद केलेला आहे. मूलभूत हक्कांची यादी घटना-कायद्याच्या तिसऱ्या भागांत दिलेली आहे. ते हक्क सर्व नागरिकांना उपभोगा-वयास मिळतात कीं नाहीं यावर देखरेख करण्यास पूर्ण अधिकारहि सुप्रीम कोर्टाला दिलेला आहे. हा सुप्रीम कोर्टाचा अधिकार म्हणजे दरएक नागरि-काचा हक्क आहे. ज्यावेळीं राष्ट्रपति आणीबाणीचा जाहिरनामा काढील त्यावेळीं मात्रं हा अधिकार तात्पुरता स्थगित केला जाईल. मूलभूत हक्कांची अंमलबजावणी करण्यासाठीं सर्व प्रकारचे हुकुम काढण्याचा अधिकार सुप्रीम कोर्टाला आहे. आणि ज्या सरकारविरुद्ध अगर अधिकाऱ्याविरुद्ध अगर व्यक्तीविरुद्ध हुकूम काढलेले असतील त्यानीं ते मानलेच पाहिजेत. त्यांच्या-पैकीं कोणीहि जर एकादा हुकूम मानला नाहीं तर त्याला योग्य ती शिक्षा करण्याचा अधिकार सुप्रीम कोर्टाला आहे.

घटनेच्या कायद्यांत नमूद केलेल्या अधिकाराबाहेर संघसरकारच्या हुकमतीं-तील क्षेत्रापुरता आणखी अधिकार सुप्रीम कोर्टास देणें हें पार्लमेंटच्या हातांत आहे.

एकादा विकट आणि सार्वजनिक स्वरूपाचा प्रश्न उपस्थित झाला असेल किंवा होण्याचा संभव असेल, आणि त्या प्रश्नाबाबत सुप्रीम कोर्टाचें मत विचारणें इष्ट आहे असें राष्ट्रपतीस वाटत असेल तर त्या प्रश्नावर सुप्रीम कोर्टाचें मत मागण्याचा राष्ट्रपतीस हक्क आहे आणि सुप्रीम कोर्टाला आपलें मत राष्ट्रपतीस कळवण्याचा अधिकार आहे. मात्र हें मत सर्व बाजू ऐकून घेतल्यानंतरच सुप्रीम कोर्टानें बनवलें पाहिजे व तें जाहीर कोर्टात प्रकट केलें पाहिजे.

साधारणपणें किती न्यायाधीश एका कोर्टात बसले पाहिजेत, एकएकव्या न्यायाधिशानें कोणतीं कामें करावीं, हें ठरविण्यासाटीं नियम करण्याचा अधिकार सुप्रीम कोर्टास आहे, मात्र हे नियम राष्ट्रपतीच्या मजुरीशिवाय करतां येणार नाहींत. याला एक अपवाद आहे. घटनेच्या कायद्याचा अर्थ करण्यासाठीं किंवा राष्ट्रपतीनें जो प्रश्न विचारला असेल त्याच्या उत्तराचा विचार करण्यासाठीं जेव्हां सुप्रीम कोर्ट बसेल त्यावेळीं कमीतकमी पांच न्यायाधीश बसले पाहिजेत.

## घटक राज्यांतील हायकोर्टें

दरएक घटकराज्यांत एक हायकोर्ट घटनाकायद्यानें निर्माण केलेलें आहे. एकाच हायकोर्टाकडे एकापेक्षां अधिक घटकांतील न्यायाधिकार सोंपवणें पार्लमेंटच्या हातांत आहे.

दर एक हायकोर्टाचा एक मुख्य न्यायाधीश असून जरूर तितके अन्य न्यायाधीश असतील. न्यायाधीश किती असावे हें ठरविण्याचा व न्यायाधिशांच्या नेमणुका करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. वयाला साठ वर्षे पुरीं झालीं म्हणजे दरएक न्यायाधिशास सेवानिवृत्त होणें भाग आहे. त्यापूर्वींहि कोणा न्यायाधिशाची इच्छा असल्यास राजीनामा देऊन सेवानिवृत्त होण्याचा त्यास हक्क आहे. ज्याची सुप्रीम कोर्टात बढती होईल त्याला साठ वर्षांचा नियम लागू नाहीं.

जर पार्लमेंटाच्या दोनहि सभांनीं हायकोर्टाच्या एकाद्या न्यायाधिशास काढून टाकावें असा ठराव दोन तृतीयांश बहुमतानें पास करून राष्ट्रपतीकडे पाठविला तर त्या न्यायाधिशास काढून टाकलें पाहिजे. एरवीं कोणाहि न्यायाधिशास साठ वर्षे पुरीं होईपर्यंत कामावरून दूर करतां येणार नाहीं. सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधिशाप्रमाणेंच हायकोर्टाच्या न्यायाधिशासहि कोणा व्यक्तीचा वा समष्टीचा मुलाहिजा ठेवण्याचें कारण पडूं नये आणि त्यानें आपलें काम निश्चितपणें व निर्भयपणें आपल्या सदसद्विवेकबुद्धीस स्मरून करावें एवढ्या हेतूनें ही व्यवस्था घटनेच्या कायद्यांत नमूद केलेली आहे. या व्यवस्थेंत फरक करण्याचा अधिकार पार्लमेंटास अगर घटकराज्यांतील

कायदेमंडळास दिलेला नाहीं. हायकोर्टाच्या न्यायाधिशाचे पगारहि घटनेच्या कायद्यांतच ठरवून दिले आहेत. मुख्य न्यायाधिशाचा पगार दरमहा रु. ४००० आणि अन्य न्यायाधिशाचा पगार दरमहा रु. ३५०० ठरविला आहे. याशिवाय कांहीं •भत्ता, हक्क आणि सवलती न्यायाधिशांना मिळूं शकतील; त्यांसंबंधीं व्यवस्था करण्याचा अधिकार पार्लमेंटास दिलेला आहे. सेवानिवृत्त न्यायाधिशास भारतांतील कोणत्याहि कोर्टात वकिली करतां येणार नाहीं.

घटकराज्यांतील सर्व कोर्टें आणि न्यायदान करण्यासाठीं नेमलेल्या तत्सम अदालती यांचेवर हायकोर्टाची हुकमत आहे. पण लष्करी नोकरांसाठीं नेमलेल्या कोर्टावर हायकोर्टाची हुकमत चालेल असें नाहीं.

घटनाकायद्याच्या कोणत्याहि कलमाचा किंवा त्या कायद्याखालीं काढलेल्या हुकमाचा अर्थ लावणें ज्या मुकदम्यांत अवश्य आहे असा मुकदमा खालच्या कोर्टात चालू आहे, असें हायकोर्टाच्या नजरेस आल्यास हायकोर्टानें तो दावा आपल्यापुढें घेतला पाहिजे.

हायकोर्टांना २६ जानेवारी १९५० पूर्वी जे अधिकार होते तेच हल्लीं चालू आहेत. त्याशिवाय मूलभूत हक्कांची अंमलबजावणी करण्याचाहि अधिकार दरएक हायकोर्टास आपापल्या प्रदेशापुरता आहे. पूर्वी महसुलाबाबतचे मुकदमे हायकोर्टाच्या अव्वल शाखेपुढें चालत नसत. आतां हा निर्बंध राहिलेला नाहीं. हायकोर्ट घटकराज्याचें असलें तरी संघसरकारला किंवा संघसरकारच्या अधिकाऱ्याला हुकूम सोडण्याचा अधिकार हायकोर्टास आहे. घटनेंत ग्रथित केलेल्या हायकोर्टाच्या अधिकारास बाध येणार नाहीं हा नियम संभाळून पार्लमेंट आणि घटकाचें कायदेमंडळ यांना कायदा करून हायकोर्टाच्या अधिकारांत बदल करतां येईल. यासंबंधीं घटकाच्या कायदेमंडळावर एक निर्बंध आहे तो असा कीं जो कायदा पास झाला असतां हायकोर्टाच्या इभ्रतींत वा कार्यक्षमतेंत अनिष्ट फरक होईल अशा कायद्याचें बिल कायदेमंडळाच्या सभागृहांनीं पास केल्यास तें बिल घटकाच्या गव्हर्नरनें वा राजमुखानें राष्ट्रपतीच्या मंजुरीसाठीं पाठविलें पाहिजे.

हायकोर्टाच्या हुकमतीखालीं डिस्ट्रिक्ट जज्ज, सेशन जज्ज, दुय्यम जज्ज, जिल्ह्याचे मुख्य मॅजिस्ट्रेट, घटकाच्या राजधानींतील मॅजिस्ट्रेट, जिल्ह्याचा जादा मॅजिस्ट्रेट, वगैरे न्यायाधिशांचीं कोर्टें आहेत. या न्यायधिशांच्या नेमणुका गव्हर्नरकडून होतील पण कोणत्या कोर्टांत कोणी काम करावें हें ठरवण्याचा अधिकार हायकोर्टाकडे आहे. तसेच त्यांची बढती रजा वगैरे प्रश्नहि हायकोर्टाच्या अखत्यारांत आहेत. मंत्र्याचें किंवा अम्मलबजावणी खात्यांतील अधिकाऱ्यांचें त्यांच्यावर दडपण येऊं नये म्हणून ही व्यवस्था घटनाकायद्यांतच नमूद केलेली आहे.

लिखित घटनेचें वैशिष्टय हें आहे कीं घटनेंत नोंदलेले यमनियम ( Does and Donts ) हे सर्व अधिकारी व्यक्तींवर व अधिकारी समष्टींवर बंधनकारक असतात. आणि हे यमानियम कोणते आहेत हें ठरवण्याचा अधिकार उच्च कोर्टाचा असतो. कोर्टाच्या अधिकाराबद्दल बरीच चर्चा होत असते आणि बरेंच अज्ञानहि प्रकट करण्यात येतें. हिंदुस्थानांत जें घटने-संबंधींचें शिक्षण पसरलें आहे तें मुख्यत्वेंकरून इंग्लिश राज्यघटनेवर आधार-लेलें आहे. त्यामुळें मोठमोठे घटनातज्ज्ञ सुद्धां कांहीं कांहीं वेळां चुकीचीं विधानें करतात. कायदे करणारी संस्था, म्हणजे आपण पार्लमेंट म्हणूं पाहिजे तर, हीच सर्वात वरिष्ठ आहे असें अनेकदां आपल्या देशांतील मोठे पुरुप म्हणत असतात. म्हैसूर संस्थानांतील पुढाऱ्यांनीं एकदां असेंच उद्गार काढले होते. पंडित जवाहरलाल नेहरू सुद्धां घटनेच्या ३१ व्या कलमावरील चर्चेच्या वेळीं अशाच तऱ्हेचें काहीं बोलले होते. या सगळ्या उद्गारांच्या बुडाशीं इंग्रजी राज्यघटनेनें आपल्या उत्तमोत्तम व्यक्तींच्या बुद्धीची घेतलेली पकड ही आहे. इंग्लंडच्या पार्लमेंटानें लोकांकडून सत्ता घेतलेली नाहीं. हिंदुस्थानांतील सर्व अधिकाऱ्यांनीं, राष्ट्रपतीनें, पार्लमेंटानें, घटकांतील अधिकाऱ्यांनीं, सर्व सत्ता लोकांकडून मिळविली आहे. ज्या कायद्यानें ती सत्ता विशिष्ट अधिका-ऱ्यांच्या हातीं दिली आहे त्याच कायद्यानें ती मर्यादित केली आहे हें लिखित घटनेचें रहस्य आहे.

कायदे करण्याची सत्ता आणि कायद्यांचा अर्थ करून त्यांचा अंमल करण्याची सत्ता या दोन अगदीं निराळ्या आहेत. लहानांतली लहान कायदे करणारी

सत्ता कायदे करण्याच्या बाबतींत पूर्ण अधिकारी असते. वरिष्ठांतील वरिष्ठ कोर्ट सुद्धां आपले कामकाजाचे नियम खेरीज करून कोणताहि कायदा करूं शकत नाहीं. आणि कामकाजाचे म्हणजे प्रोसीजरचे नियम करतांना घटनेच्या कायद्यानें घालून दिलेले निर्बंध उच्चतम कोर्टाला सुद्धां पाळावे लागतात. एकाद्या ग्रामपंचायतीनें केलेला नियम सुप्रीम कोर्टावर बंधनकारक आहे. फार कशाला, एकाद्या खाजगी संस्थेनें आपल्या घटनेंत जे नियम केलेले असतात ते सुद्धां सुप्रीम कोर्टावर बंधनकारक असतात. कायदा अगर यमनियम करण्याच्या बाबतींत कोर्टाला कोणत्याहि प्रकारचा अधिकार नाहीं. पण कायदा करणाऱ्या अधिकारी संस्थेनें कायदा केला म्हणजे त्याचा अर्थ करण्याच्या बाबतींत सपूर्ण अधिकार कोर्टाकडे जातो. त्या ठिकाणीं मात्र कायदे करणारी संस्था, मग ती अगदीं अखिल भारतीय पार्लमेंट असो, असमर्थ ठरते. आम्ही अमुक शब्द किंवा वाक्य वापरलें त्यावेळीं आमचा असा उद्देश होता असें सांगण्याचा अधिकार पार्लमेंटास नाहीं. कायदे करणाऱ्या अधिकारी समितीनें केलेल्या कायद्याचा अर्थ कोर्टानें जो केला असेल तोच पार्लमेंटासहि मान्य करावा लागतो. एवढेंच कीं, दुसरा कायदा करून कोर्टानें केलेला अर्थ फोल करण्याचा मर्यादित किंवा कांहीं वेळां अमर्यादित अधिकार कायदा करणाऱ्या अधिकारी समितीस असतो.

पार्लमेंटावर जी कोर्टाची सत्ता असते ती पार्लमेंट आपल्या अधिकाराचें अतिक्रमण करीत आहे कीं काय हें ठरविण्यापुरती असते. कोणत्याहि कायदे करणाऱ्या सत्तेनें अधिकाराचें अतिक्रमण केलें कीं तेवढ्यापुरता तो कायदा रद्द करण्याचा बिनशर्त अधिकार न्यायकोर्टाकडे असतो. इंग्लंडमध्यें पार्लमेंट-खेरीज बाकीच्या ज्या कायदे करणाऱ्या अधिकारी संस्था आहेत त्यांचे कायदे अधिकाराचें अतिक्रमण करणारे आहेत कीं काय तें ठरविण्याचा अधिकार तेथील न्यायकोर्टें वापरतात. लिखित घटनेनें निर्माण केलेल्या सर्व अधिकारी संस्था या वर्गात मोडतात. इंग्लंडच्या पार्लमेंटच्या कायद्याची मात्र अशा प्रकारची छाननी करण्याचा अधिकार इंग्लंडच्या कोर्टांना नाहीं. तसेंच आपल्या घटनेच्या कायद्याच्या बाबतींत मात्र अशा प्रकारची छाननी होऊं शकणार नाहीं. घटनेच्या कायद्यांतील कोणतेंहि कलम अधिकाराचें अतिक्रमण

करूं शकत नाहीं. पण हिंदी पार्लमेंटनें केलेल्या कायद्यांची या कसोटीवर परीक्षा करण्याचा अधिकार कोर्टास आहे. सुप्रीम कोर्टानें प्रतिबंधक अटकेसंबंधींच्या कायद्याचें एक कलम ( कलम १४ ) पार्लमेंटाच्या अधिकाराबाहेरचें आहे असा निकाल दिला. हा निकाल पार्लमेंटासहि बंधनकारक आहे. कायदे करणाऱ्या अधिकारी संस्थेवर कोर्टाची हुकमत एवढीच. एकाद्या कायद्यांत अधिकाराचें अतिक्रमण नाहीं एवढें सिद्ध झालें म्हणजे मग त्याची अंमलबजावणी करणें हेंच कोर्टाचें काम आहे. त्या कायद्याच्या इष्टानिष्टतेची वा योग्यायोग्यतेची चर्चा करण्याचा अधिकार कोणत्याहि कोर्टास नाहीं.

नागरिकांनीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं मूलभूत हक्कांचें संरक्षण समर्थ न्यायालयेंच करूं शकतील. न्यायालयांचे अधिकार घटना-कायद्यांत लिहून ठेवलेले असले तरी सर्व कोर्टाचें सामर्थ्य—सुप्रीम कोर्टाचें सामर्थ्य सुद्धां—जनतेच्या जागरूकतेवर अवलंबून आहे. सुप्रीम कोर्ट काय किंवा हायकोर्ट काय यांच्याबद्दल आपण नागरिकांनीं टीकेचें नव्हे तर आपलेपणाचें धोरण ठेवलें पाहिजे. कोर्टाजवळ दुसरें सामर्थ्य नाहीं. न्यायाधीश म्हणजे परमेश्वर नाहीत कीं ते कधीं चुकणारच नाहींत. पण उच्चतम कोर्ट चुकत नाहीं हा संकेत आपण मानलाच पाहिजे. तो आपण म्हणजे नागरिकांनीं मानला तरच कोर्ट आपलें कर्तव्य करूं शकतील हें ध्यानांत ठेवावें.

सुप्रीम कोर्टाचे एक न्यायाधीश जस्टिस दास यांनीं ता. १९ मे १९५० रोजीं जें एक वाक्य आपल्या निकालपत्रकांत लिहिलें तें अत्यंत विचारणीय आहे. जस्टिस दास म्हणाले:

'Our protection against legislative tyranny lies, in the ultimate analysis, in a free and intelligent public opinion which must eventually assert itself.'

---

## भाग आठवा

# क वर्गांतील घटक

हिंदुस्थानांत कांहीं प्रदेश असे आहेत कीं ते जरी घटक म्हणून ओळखले जाऊं शकले तरी त्यांना स्वायत्तता नाहीं. घटनेच्या कायद्यांत उपरिनिर्दिष्ट घटकांचा समावेश 'क' वर्गात केलेला आहे. त्या घटकांचीं नांवें: (१) अजमीर (२) भोपाळ (३) बिलासपूर (४) कुचबिहार (५) कुर्ग (६) दिल्ली (७) हिमाचलप्रदेश (८) कच्छ (९) मणिपूर (१०) त्रिपुरा (११) विंध्यप्रदेश. या घटकांचा सर्व कारभार राष्ट्रपतीच्या हातांत आहे आणि त्या प्रांतांसाठीं कायदे करण्याचा संपूर्ण अधिकार पार्लमेंटास घटनेच्या कलम २४६ च्या चौथ्या पोटकलमानें दिलेला आहे. या कलमाला अपवाद नाहीं. ब्रिटिश पार्लमेंटानें जे कायदे हिंदुस्थानच्या राज्यघटनेसंबंधीं केले होते त्यांत 'रेग्युलेशन' या नांवानें कायदे करण्याचा अधिकार गव्हर्नरजनरल इन कौन्सिलला दिलेला असे. १९३५ च्या कायद्यांत रेग्युलेशन करण्याचा अधिकार मध्यवर्ति सरकारला दिलेला नव्हता, पण कायदे करण्याचा अधिकार गव्हर्नरजनरलला दिलेला होता. आपल्या नव्या घटनेंत रेग्युलेशन करण्याचा अधिकार संघसरकारला दिलेला नाहीं आणि कायदे करण्याचा अधिकार राष्ट्रपतींना दिलेला नाहीं. संघसरकारच्या सर्व क्षेत्रासाठीं कायदे करण्याचा अधिकार फक्त पार्लमेंटास दिलेला आहे. याला अपवाद म्हणजे अगदीं थोड्या मुदतीसाठीं ऑर्डिनस जाहीर करण्याचा राष्ट्रपतीस अधिकार दिलेला आहे आणि तो अधिकार पार्लमेंटानें दिलेला नसून घटनेनें दिलेला आहे. या अधिकाराच्या बाबतींत घटकांच्या निरनिराळ्या वर्गाचा अगर दर्जाचा कांहीं एक संबंध नसून सर्व संघाला तो सारखा लागू आहे.

क वर्गांतील घटकांसाठीं चीफ कमिशनर वा लेफ्टनंट गव्हर्नर नेमण्याचा राष्ट्रपतीस अधिकार आहे. किंवा शेजारच्या घटक सरकारला सुद्धां क वर्गांतील एकाद्या संस्थानचा राज्यकारभार चालवावयास सांगण्याचा अधिकार

राष्ट्रपतीस आहे. या वर्गांतील कोणत्याहि संस्थानांत कायदेमंडळ अथवा मंत्रिमंडळ अस्तित्वांत आणण्यासाठीं कायदा करण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे. कायदेमंडळांत सगळेच सभासद लोकांनीं निवडले पाहिजेत असा निर्बंध नाहीं. तसेंच मंत्रिमंडळाच्या ऐवजीं सल्लागारमंडळहि नेमतां येईल. कायदे-मंडळ व मंत्रिमंडळ या दोहोंचीहि निर्मिति करण्याचा पार्लमेंटास अधिकार आहे. कायदेमंडळ व मंत्रिमंडळ यांचे अधिकार पार्लमेंट कायदे करून ठरवील.

या वर्गांतील घटकासाठीं एखादें हायकोर्ट निर्माण करणें किंवा आधींच अस्तित्वांत असलेल्या एकाद्या कोर्टाला हायकोर्टाचा दर्जा देणें हें पार्लमेंटच्या अखत्यारांत आहे.

कुर्ग संस्थानांत पूर्वी अस्तित्वांत असलेलें कायदेमंडळ अधिकारारूढ राहील. मात्र नवा कायदा करून निराळ्या प्रकारचें कायदेमंडळ निर्माण करण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे. कुर्गच्या जमाखर्चाची व्यवस्था होती तीच चालू राहील पण त्यांत बदल करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे.

या वर्गांतील घटकांत कायदेमंडळ नेमलेलें असलें तरी पार्लमेंटच्या कायदे करण्याच्या अधिकारांत कोणताहि कमीपणा येत नाहीं.

## भाग नववा

# ड वर्गांतील घटक

अंदमान आणि निकोबार बेटें ड वर्गातील घटक म्हणून घटनाकायद्याच्या परिशिष्टांत नमूद केलेले आहेत. हीं बेटें आणि असेच दुसरे कांहीं प्रदेश जे भारतांत समाविष्ट आहेत पण घटकांच्या कोणत्याहि वर्गांत समाविष्ट नाहींत त्यांच्या राज्यकारभारासंबंधीं सर्व अधिकार राष्ट्रपतीकडे आहे. आपल्या मर्जीप्रमाणें राष्ट्रपतीनें चीफ कमिशनरची अगर अन्य अधिकाऱ्याची नेमणूक करावी. या वर्गांतील प्रदेशासाठीं रेग्युलेशन करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. ऑर्डिनन्स थोड्या मुदतीकरतां काढतां येतें तशी कालमर्यादा रेग्युलेशनला नसते. रेग्युलेशन म्हणजे राष्ट्रपतीनें केलेला कायदा, आणि पार्लमेंटानें केलेल्या कायद्याइतका मान रेग्युलेशनला लोकांनीं व अधिकाऱ्यांनीं दिला पाहिजे. पार्लमेंटनें केलेल्या कायद्यांत फरक करण्याचा अधिकार या प्रदेशां-पुरता घटनाकायद्याच्या २४३ व्या कलमानें राष्ट्रपतीस दिला आहे. मात्र पार्लमेंटचा कायदे करण्याचा अधिकार या कलमानें नष्ट केलेला नाहीं.

## भाग दहावा

# आदिवासी व वन्य लोकांचा प्रदेश

कांहीं जातींची प्रजा मागासलेली आहे. इतकेंच नव्हे तर ज्याला आपण सुसंस्कृत प्रदेश म्हणतों त्या प्रदेशापासून ते इतके दूर राहातात आणि त्यांचे आचार विचार इतके निराळे आहेत कीं त्यांच्यासाठीं राज्यकारभाराची खास व्यवस्था करणें अवश्य वाटलें. दहाव्या भागांत फक्त एकच कलम आहे आणि त्याचीं दोन पोट कलमें आहेत. कलम २४४ पोट कलम १ हें आसामखेरीज इतर घटकांतील मागासलेल्या किंवा वन्य प्रदेशाला लागू असून, पोट कलम २ हें आसाममधील प्रदेशांना लागू आहे. या दोन पोट कलमांनीं या दोन परिशिष्टांतील नियम घटनाकायद्याच्या दहाव्या भागांत समाविष्ट केल्यासारखे आहेत. या परिशिष्टांत वेळोवेळीं फरक करण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे. घटनेच्या सेचाळिसाव्या कलमांत असें फर्मावलेलें आहे कीं हरिजन व आदिवासी लोकांची खास काळजी घेणें हें सरकारचें कर्तव्य आहे. या समाजांचे खास प्रतिनिधि पार्लमेंटाच्या व घटकांतील कायदेमंडळांच्या लोकसभामध्यें असले पाहिजेत म्हणून कलम ३३० मध्यें असें फर्मावलें आहे कीं या समाजांसाठीं जागा राखून ठेवल्या आहेत. पण त्यानंतर येणाऱ्या ३३४ कलमांत असें फर्मावलें आहे कीं या राखीव जागा १९६० नंतर नाहींशा होतील. तेव्हां या दहा वर्षांत या मागासलेल्या लोकांची व प्रदेशांची सुधारणा करण्यासाठीं कसून प्रयत्न झाले पाहिजेत. जसजशी प्रगति होईल तसतसा पांचव्या व सहाव्या परिशिष्टांत दिलेल्या नियमावलीमध्यें फरक करणें इष्ट होईल, किंबहुना भाग पडेल. परिस्थित्यनुरुप फरक करतांना घटनेंत दुरुस्ती करण्याची पाळी येऊं नये म्हणून जरूर ते फरक करण्याचा अधिकार पार्लमेंटास दिला आहे. या दोन परिशिष्टांत दिलेली व्यवस्था कायमच्या स्वरूपाची आहे असें कोणीहि मानूं नये, म्हणून तत्संबंधींचे नियम पांचव्या व सहाव्या परिशिष्टांत ग्रथित केले असावे.

## भाग अकरावा

# संघ व घटक यांचे संबंध

भारताच्या लिखित घटनेंत संघ आणि घटक या दोहोंमध्यें कायदे करण्याचा आणि राज्य चालवण्याचा अधिकार वांटून दिलेला आहे. ही वांटणी करतांना संघ प्रबल करण्याकडे आपल्या घटनेचा ओढा कसा आणि किती आहे याची चर्चा यापूर्वीच येऊन गेली आहे. तिची पुनरावृत्ति करण्याची आवश्यकता नाहीं. वांटणीचें घटनात्मक महत्त्व विशद करण्याचें येथें खास प्रयोजन आहे. घटकांच्या स्वायत्ततेला अगदींच झुगारून देण्याची तयारी कांग्रेसच्या पुढाऱ्यांची नव्हती म्हणून पुष्कळशी रोडावलेली स्वायत्तता तरी घटकांच्या वांट्यास आलेली आहे. सरकारचें अधिकारक्षेत्र वांटण्याचें कार्य कलम २४६ आणि परिशिष्ट (शेड्यूल) सात यांच्याद्वारा केलेलें आहे. अधिकारक्षेत्राच्या बाबींच्या तीन याद्या केल्या आहेत; यांपैकीं पहिल्या यादीला 'संघयादी,' दुसऱ्या यादीला 'घटक–यादी' आणि तिसऱ्या यादीला 'समवर्ति यादी' अशीं अनुक्रमें नांवें दिलीं आहेत. याशिवाय एक काल्पनिक यादी घटनेच्या २४८ व्या कलमाने तयार केली आहे असें म्हणतां येईल. म्हणजे सातव्या परिशिष्टांत दिलेल्या कोणत्याहि यादींत ज्या बाबींचा उल्लेख नाहीं अशी प्रत्येक बाब संघसरकारकडे सोंपविली आहे असें त्या कलमांत फर्माविलें आहे. अशा बाबींचीहि एक काल्पनिक किंवा अध्याहृत यादीच आहे असें म्हटलें तरी चालेल. याला शेषाधिकार असें म्हणतात. १९४७ च्या सुरुवातीस जो उद्दिष्टांचा ठराव पास झाला होता त्यांत जाहीर केल्याच्या अगदीं उलट व्यवस्था घटनेच्या २४८ व्या कलमांत केलेली आहे हें येथें नमूद करण्यास हरकत नसावी.

या तीन याद्यांपैकीं पहिली व दुसरी या विरोधात्मक आहेत असें समजावयास हरकत नाही. पहिल्या यादींत असलेल्या कोणत्याहि बाबींवर घटकसरकारचा अधिकार नाहीं; हा सिद्धांत निरपवाद आहे. दुसऱ्या यादींत असलेल्या कोणत्याहि बाबीवर संघ सरकारचा अधिकार नाहीं असा नियम आहे. दरएक नियमाला अपवाद असतो असें म्हणतात. तसे या

नियमालाहि अपवाद आहेत; म्हणजे हा सिद्धांत निरपवाद नाहीं पण सिद्धांत आहे याबद्दल शंका नाहीं. तिसरी यादी अशा बाबींची आहे कीं त्या बाबींसंबंधीं अधिकार संघसरकारला आहे आणि घटकसरकारला पण आहे. या बाबींचा तपशील येथें द्यावयाचा म्हणजे परिशिष्ट जसेंच्या तसें भाषांतर करून द्यावें लागेल. तें तसें देण्याचा उद्देश नाहीं. साधारपणें या विभागणीला एक कसोटी लावण्याजोगी आहे. देशाच्या ऐक्याला अवश्य अशी दरएक बाब संघ-सरकारच्या ताब्यांत दिलेली आहे असा मोघम सिद्धांत मांडावयास हरकत नाहीं. देशाचें रक्षण करावयास लागणारें सैन्य आरमार व वैमानिक दल आणि तदनुषंगिक सर्व गोष्टी संघाकडे आहेत. म्हणूनच पुणें जिल्ह्यांतील खडकवासल्याच्या धरणाजवळ स्थापन झालेली लष्करी शिक्षणाची अकॅडेमी संघ-सरकारच्या हुकमतींत आहे. नागरिक कोणाला म्हणावें, नागरिकांचे राष्ट्रीय हक्क कसे संभाळावे, परदेशांतून येणाऱ्या मालावर जकात किती बसवावी अगर कोणते निर्बंध घालावे, नागरिकांच्या उत्पन्नावर कराचा बोजा किती टाकावा, या सर्व बाबी राष्ट्रीय महत्त्वाच्या असल्यामुळें त्या संघसरकारच्या ताब्यांत आहेत. दळणवळणाचीं राष्ट्रीय साधनें म्हणजे पोस्ट, तारखातें, रेल्वेखातें, आंतरप्रांतीय रस्ते, आंतरप्रांतीय जलमार्ग, हवामार्ग, संघसरकारच्याच ताब्यांत आहेत. उलट पक्षीं जमीनमहसूल, शिक्षण, आरोग्य, मादक पदार्थांची उत्पत्ति व सेवन, प्रांतांतील खरेदीविक्री, स्थानिक स्वराज्यसंस्था, प्रांतिक रस्ते, या बाबी घटकसरकारच्या ताब्यांत आहेत. दुसरी यादी या पुस्तकांत शेवटीं शेवटीं दिलेली आहे.

## अर्थपूर्ण शब्द

कलम दोनशे सेहेचाळीस पोटकलम तीन याचा परिणाम काय होतो हें आतां पहावयाचें आहे. पोटकलम तीनमध्यें exclusive हा शब्द वापरला आहे. याचें श्री. देवगिरीकरांनीं 'संपूर्ण' या शब्दानें भाषांतर केलें आहे. हिंदी भाषांतरांत 'अनन्य' या शब्दानें भाषांतर केलें आहे. या दोहोंपैकीं हिंदी भाषांतरांत वापरलेला शब्द जास्त यथार्थ व अर्थपूर्ण आहे. इंग्रजींत जो शब्द वापरला आहे त्याचा पूर्ण अनुवाद वर दिलेल्या दोहोंपैकीं एकहि शब्दानें केला जात नाहीं. घटकराज्यांची यादी म्हणून जी दिली आहे तिच्यांतील

चावींसबंधींचा अधिकार संघाकडे नाहीं हें स्पष्ट करण्यासाठीं हा इंग्रजी शब्द वापरलेला आहे. पुढें आलेल्या कांहीं कलमांमध्यें जे अपवाद दिले आहेत त्यांचा विचार करतां exclusive हा शब्द वापरणें कितपत योग्य होतें याबद्दल या ठिकाणीं चर्चा करावयाची नाहीं. घटकांचा दर्जा दाखविण्याकरितां तो शब्द वापरलेला आहे एवढें या ठिकाणीं स्पष्ट करावयाचें आहे आणि तो शब्द वापरण्याचा परिणाम काय होतो याचा अभ्यास करावयाचा आहे.

## पार्लमेंट स्वयंभू नव्हे

या एका विशिष्ट गुणधर्मावर अथवा तपशिलावर एवढा भर देण्याचा उद्देश हा कीं लिखित घटनेंत मध्यवर्ति कायदेमंडळ हें सुद्धां बंधनांनीं आणि मर्यादांनीं जखडलेलें असतें हा सिद्धांत सर्वांना समजावा. तीं बंधनें मध्यवर्ती कायदेमंडळानें म्हणजे पार्लमेंटानें स्वेच्छेनें घातलेलीं नाहींत आणि पार्लमेंटाला तीं रद्द करतां येत नाहींत. परिणाम असा कीं, इंग्लंडच्या स्वयंभू पार्लमेंटा-सारखें आपल्या भारताचें पार्लमेंट स्वयंभू नाहीं. स्वयंभू पार्लमेंट आपला अधिकार दुसऱ्या पार्लमेंटाला देऊं शकतें. भारताचें पार्लमेंट आपले अधिकार दुसऱ्याला देऊं शकत नाहीं. स्वयंभू पार्लमेंट तारतम्यानें दुसऱ्याला दिलेले अधिकार परत घेऊं शकतें. भारताच्या पार्लमेंटास तशा प्रकारचें सामर्थ्य नाहीं म्हणजे घटकाचे अधिकार आपल्या हातांत घेण्याचें सामर्थ्य नाहीं, आणि जें मर्यादित अगर तात्पुरतें सामर्थ्य आहे तें घटनेच्या कायद्यानें पार्लमेंटाला दिलेलें आहे, पार्लमेंटच्या इच्छेनें मिळालेलें नाहीं. पार्लमेंटच्या अधिकारावर मर्यादा आहे या एका महत्त्वाच्या गोष्टीची जाणीव झाली म्हणजे न्यायकोर्ट वरिष्ठ कीं पार्लमेंट वरिष्ठ असा प्रश्न उपस्थित होत नाहीं आणि कोणी केला तर सुजाण माणूस त्याचें उत्तर तात्काल देऊं शकतो. ज्याच्या अधिकारावर मर्यादा आहे तो त्या मर्यादा कोणत्या आहेत हें ठरवण्याच्या कामीं अधिकारी नसतो, तो अधिकार न्यायकोर्टाकडेच जातो.

हिंदी पार्लमेंटचा दर्जा सर्वाधिकारी अगर स्वयंभू नाहीं ही गोष्ट—एका बाजूनें कांहीं वेळ जरुर नाहीं इतक्या प्रमाणांत—ज्यांना पूर्णपणें पटलेली आहे अशा माणसांनीं तरी कोर्टाच्या अधिकाराबद्दल शंकाकुशंका काढावयास नको. दाखला म्हणून घटनेच्या २४५ कलमाच्या दुसऱ्या पोटकलमाच्या भाषेकडे पहाः

245 (2) No law made by Parliament shall be deemed to be invalid on the ground that it would have extraterritorial operation. भारताच्या भौगोलिक मर्यादेच्या बाहेर ज्या कायद्याचा अंमल पोंचेल असा कायदा पार्लमेंटनें केला तर तो बेसनदशीर नाहीं असें या पोटकलमांत सांगितलें आहे. असें जाहीर करण्याची आवश्यकता भासली हाच पार्लमेंटच्या मर्यादित अधिकाराचा झणझणीत पुरावा आहे. दुर्दैव हें कीं हा देतांना आमची घटना बनवणारांनीं न्यूनगंडाचें प्रदर्शन केलें. हा न्यूनगंड घटनेचा मसुदा तयार करणारांच्या डोक्यांत इंग्रज घट्ट जागा धरून बसलेला आहे याचा परिणाम आहे.

## भाग बारावा

# अर्थ, मिळकत, करार, फिर्यादी

भारताच्या नव्या राज्यघटनेच्या कायद्यावर १९३५ च्या कायद्याची छाया पडली आहे हें या पुस्तकांत अनेक वेळां सांगितलेलें आहे; आणि या सिद्धांताला भारताच्या पहिल्या राष्ट्रपतींनीं पाठिंबा दिलेला आहे. १९३५ च्या कायद्याची जास्तींत जास्त छाप जर कुठल्या भागावर पडली असेल तर ती भाग १२ (म्हणजेच कलमें २६४ ते ३००) वर पडलेली आहे. या भागाचें शीर्षक श्री. देवगिरीकरांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे 'अर्थ, मिळकत, करार आणि फिर्यादी' असें आहे. १९३५ च्या कायद्यांत हा विषय सातव्या भागांत आलेला होता. जशी राज्य करण्याच्या अधिकाराची तशीच जमाखर्चाचीहि वांटणी संघ आणि घटक यांच्यामध्यें करावी लागते आणि घटकांचे मर्यादित कां होईना स्वायत्तत्व मान्य केलें म्हणजे ही वांटणी घटनाकायद्यांतच नमूद करून ठेवावी लागते.

### नागरिक व सरकार

उत्पन्नाची वांटणी खेरीज करूनमुद्धां कांहीं बाबींची तरतूद या भागांत केलेली आहे. कायद्यानें प्रस्थापित केलेल्या राज्यांत सरकार व नागरिक यांच्यामध्यें कांहीं विशिष्ट बाबतींत समता निर्माण होते. नागरिक हा एक व्यक्ति असतो आणि त्याच्याकडे बोट दाखवितां येतें. सरकार ही एक समष्टि असते आणि कित्येक वेळां तिजकडे बोट दाखवितां येत नाहीं. म्हणून समष्टीचें कायदेशीर अस्तित्व जाहीर करून तिला व्यक्तीप्रमाणेंच व्यवहार करण्याचें सामर्थ्य कायद्यानें द्यावें लागतें. जसें सामर्थ्य तशीच जबाबदारी कायद्यानेंच निश्चित करावी लागते.

हा भाग फारच तंत्रपूर्ण आणि साधारण वाचकाला (मग तो सुशिक्षित असो वा थोडा शिक्षित असो) दुर्बोध किंवा कंटाळवाणा वाटणारा आहे. पण या भागाचा मुळींच परामर्ष न घेऊन चालणार नाहीं म्हणून या भागांतील महत्त्वाचा भाग तेवढाच देण्यांत येत आहे.

## दोन व्याख्या

या भागांतील पहिल्या कलमांत दोन व्याख्या दिल्या आहेत. त्यानंतरच्या पहिल्याच कलमांत एक मूलभूत हक्क ग्रथित केलेला आहे. 'फक्त कायद्याला धरून कर बसवतां येईल आणि वसूल करतां येईल' असें कलम २६५ मध्यें फर्मावलेलें आहे. १९३५ च्या कायद्यांत असें कलम नाहीं. राजा प्रजेकडून कर वसूल करूं शकतो, तो त्याचा स्वयंभू हक्क आहे असें पूर्वी मानण्यांत येत असे. 'सारा' हा जो शब्द आहे तोसुद्धां या कल्पनेवरच आधारलेला आहे. राजा प्रजेचें रक्षण करतो त्याबद्दल प्रजेकडून सारा घेण्याचा राजाचा हक्क आहे अशीच पूर्वीची मान्य समजूत होती. ईस्ट इंडिया कंपनी मोंगल बादशहांची वारसदार म्हणून हिंदुस्थानांत लोकांकडून कर वसूल करूं लागली आणि ईस्ट इंडिया कंपनीचा सर्व हक्क आणि अधिकार १८५८ सालीं इंग्लंडच्या राजाकडे गेला. इंग्लंडमध्यें सुद्धां सन १२१५ पर्यंत राजा प्रजेकडून आपल्या इच्छेप्रमाणें कर वसूल करीत असे. सन १२१५ सालीं राजा जॉन यानें एक करार केला आणि लोकप्रतिनिधींच्या संमतीशिवाय यापुढें मी कर बसवणार नाहीं असें बंधन घालून घेतलें. हिंदुस्थानला हा नियम लागू करण्यांत आला नाहीं, याचा पुरावा १९३५ च्या कायद्याच्या २२६ व्या कलमांत सांपडेल. आतां परिस्थिति बदलली आहे. आतां हिंदुस्थानांत जें राज्य स्थापन झालें आहे तें कायद्याच्या आधारावर स्थापन झालें आहे.

## लोकांचा स्वयंभू हक्क

जरी लोकांचा स्वयंभू हक्क घटनाकायद्याच्या प्रास्तविक भागांत जाहीर केलेला नसला तरी तो गृहीत धरलेला आहे. सन १९४७ सालीं जो ठराव घटनासमितीनें पास केला त्यांत हिंदी जनतेचा स्वयंभू हक्क मान्य करून जाहीरहि केलेला आहे. त्या ठरावाच्या चौथ्या परिच्छेदाचें श्री. देवगिरीकरांनीं केलेलें भाषांतर येथें उद्धृत करण्यांत येत आहे:

"(४) या स्वतंत्र, सार्वभौम हिंदी लोकराज्याची, तिच्या घटकांची आणि राज्ययंत्राची शक्ति आणि सत्ताधिकार यांचें उगमस्थान हिंदी जनता हेंच आहे." असें असल्यामुळे जनतेमधील कोणत्याहि व्यक्तीकडून पैसा वसुल करावयाचा झाल्यास कायद्याचा आधार पाहिजे. हा मूलभूत हक्क आहे. या

दृष्टीनें पहातां नव्या घटनाकायद्याचें २६५ वें कलम मूलभूत हक्कांच्या भागांत घातलें पाहिजे होतें. पण तें त्या भागांत न घालण्याचें एक कारण असूं शकेल. तिसऱ्या भागांत तेराव्या कलमांत असें फर्मावलें आहे कीं तिसऱ्या भागांत नमूद केलेल्या मूलभूत हक्काशीं विसंगत असलेले सर्व कायदे रद्द समजण्यांत यावे. हें नियमन फक्त तिसऱ्या भागांतील योजनेपुरतें आहे, अन्य भागांतील योजनेला तें लागू नाहीं: तेराव्या कलमांतील नियमन लागू होऊं नये हेंच उद्दिष्ट मनांत ठेवून घटनाकायदा बनविणारांनीं २६५ वें कलम बाराव्या भागांत घातलें असेल तर तें कृत्य सकारण ठरेल. मुंबई इलाख्यांत धारेकऱ्यांकडून जो जमीनमहसूल वसूल करण्यांत येतो त्याचा २६५ व्या कलमाच्या दृष्टीनें कोणी विचार केल्यास मनोरंजक प्रकार पहावयास सांपडण्याचा संभव आहे.

## इंग्रजी राजवटींतील चोख हिशोब

इंग्रजांच्या राजवटींत जर कांहीं निर्भेळ चांगलें असेल तर तें हिशोबाचें खातें होय. इंग्रजांची हिशोबाची पद्धत अतिशय चोख आणि शास्त्रशुद्ध असे आणि त्या पद्धतीची परिणामकारकता हिशोबी खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याचें जें महत्त्व मानलें जाई त्यांत होती. अकौंटंटजनरल हें नांव सर्वसाधारणपणें माहित आहे. जसा एका प्रांताचा अकौंटंटजनरल तसा अखिल हिंदुस्थानचा 'कॉम्प्ट्रोलर' व 'ऑडिटर-जनरल' असे. त्याला काढून टाकण्याचा अधिकार हिंदुस्थानांतील कोणत्याहि अधिकाऱ्याला नव्हता त्यामुळें तो आपलें काम स्वतंत्रपणें म्हणजे कोणाचाहि मुलाहिजा न ठेवतां करूं शकत असे. १९३५ च्या कायद्यांत कलम १६६ मध्यें असें सांगितलें आहे कीं फेडरल कोर्टाच्या न्यायाधिशाला ज्या कारणानें काढून टाकतां येईल फक्त त्याच कारणानें ऑडिटरजनरलला काढतां येईल, एरवी नाहीं. इतका त्याचा दर्जा उच्च व अबाधित ठेवलेला होता. १९३५ च्या कायद्यांत ऑडिटरजनरलसंबंधीं व्यवस्था सातव्या भागांत केली होती. आपल्या नव्या घटनाकायद्यांत या मुख्याधिकाऱ्याचा उल्लेख आणि त्याच्या-संबंधींची व्यवस्था कलम १४८ मध्यें संघराज्याच्या भागांत केली आहे. या लेखकाच्या मतें १९३५ च्या कायद्यांतील व्यवस्था जास्त चांगली होती.

जितका उच्च दर्जा १९३५ च्या कायद्यानें ऑडिटरजनरलला दिला होता तितकाच उच्च दर्जा आपल्या स्वतंत्र राज्यघटनेच्या कायद्यांतहि दिलेला आहे. सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधिशाइतकें रक्षण त्यालाहि दिलें आहे. ब्रिटिश राजवटींतील हा जो स्पृहणीय विशेष होता तो आपल्या घटनाकायद्यांतहि घातला आहे.

सर्व सरकारी खर्चावर देखरेख करण्याचें काम या अधिकाऱ्याचें आहे. मंजुरी देणाऱ्या अधिकाऱ्याच्या इच्छेप्रमाणें खर्च होतो आहे किंवा नाहीं, आणि मंजुरी देणाऱ्या अधिकाऱ्याला ती मंजुरी देण्याचा अधिकार आहे किंवा नाहीं या दोनहि गोष्टी त्यानें पहावयाच्या असतात. मुख्य मंत्री किंवा राष्ट्रपति यांच्या खर्चावर सुद्धां हा अधिकारी देखरेख ठेवूं शकतो. अलीकडे अशी तक्रार होते कीं पंडित जवाहरलाल नेहरूंच्या खात्यावर फाजील खर्च होतो. म्हणून परदेशांतील वकिलातींची पहाणी करण्याचें काम भारताच्या ऑडिटर-जनरलकडे सोंपविण्यांत आलें आहे हें वाचकांनीं वाचलेंच असेल. या अधिकाऱ्यानें तयार केलेले अहवाल पार्लमेंट व प्रांतिक कायदेमंडळें यांचेपुढें ठेवण्यांत आले पाहिजेत अशी अनुज्ञा घटनाकायद्याच्या १५१ कलमांत केलेली आहे.

## सरकारचे निधि

जमा झालेला सर्व पैसा एका निधीमध्यें ठेवावा लागतो. संघसरकारचा एक निधि असतो, आणि प्रत्येक घटकसरकारचा एक निधि असतो. याशिवाय संघसरकारचा आणि प्रत्येक घटकसरकारचा एक सादिलवारनिधि असतो. हा निधि निराळा ठेवण्याचें कारण असें कीं कांहीं वेळां पार्लमेंटकडून अगर घटकाच्या लोकसभेकडून खर्चाचें पत्रक रीतसर मंजूर व्हावयास वेळ लागतो तेव्हां त्यावेळेपर्यंत अनपेक्षित खर्चासाठीं या रकमा संघसरकार व घटकसरकारें वापरूं शकतात. या निधींमधील पैशाचा व्यय कायद्याला धरूनच करतां येईल आणि घटनाकायद्यांत नमूद केलेल्या कामासाठीं व बाबींसाठीं फक्त करतां येईल.

## २७३ कलमानें केलेली व्यवस्था

राज्यकारभाराच्या बाबतींत आणि कायदे करण्याच्या बाबतींत जी अधिकारविभागणी संघ व घटकसरकारें यांच्यामध्यें करण्यांत आली आहे

त्तीच उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबतींत लागू आहे. शिवाय संघसरकारकडून वेळोवेळीं घटकांना मदत मिळण्याचीहि व्यवस्था घटनेच्या कायद्यांत आहे. उत्पन्नावरचा कर संघसरकारचा आहे खरा, पण त्यांतील कांहीं वांटा घटक-सरकारांना द्यावा अशी व्यवस्था २७० व्या कलमांत केलेली आहे. आयात-निर्यात संघसरकारच्या क्षेत्रांत येते. पण आसाम, बिहार ओरिसा, व बंगाल या प्रांतांतून जो ताग बाहेर जातो त्याच्यावरील कराचा कांहीं भाग त्या घटकांना मिळावा अशी व्यवस्था २७३ व्या कलमांत केली आहे.

भारताची आर्थिक व्यवस्था चोख रहावी व तिच्यांत सुधारणा व्हावी या उद्देशानें ता. २६ जानेवारी १९५२ च्या आधीं राष्ट्रपतींनीं एक कमिशन नेमलें पाहिजे आणि त्यानंतर दर पांच वर्षांनीं एक कमिशन नेमलें पाहिजे. या कमिशनचे अहवाल व शिफारशी राष्ट्रपतींनीं पार्लमेंटपुढें ठेवल्याच पाहिजेत. या कमिनशला फिनॅन्स कमिशन हें नांव आहे.

## कर्ज काढण्याचा अधिकार

संघसरकार आणि घटकसरकारें यांना कर्ज काढण्याचा अधिकार कलमें २९२ व २९३ यांमध्यें देण्यांत आला आहे. संघसरकारचा निधि आणि घटकाचा निधि अनुक्रमें संघसरकारच्या आणि घटकाच्या कर्जाला तारण समजण्यांत येईल. ज्यास्तींत ज्यास्त किती कर्ज काढतां येईल हे अनुक्रमें पार्लमेंट व घटकांचीं कायदेमंडळें कायदा करून ठरवतील. ती मर्यादा ओलांडावयाची असेल तर संघसरकारला पार्लमेंटपुढें आणि घटकसरकारांना आपापल्या कायदेमंडळापुढें गेले पाहिजे. संघसरकार घटकसरकारांना कर्ज देऊं शकतें. घटकसरकार म्युनिसिपालिट्यांना व इतर स्थानिक अधिकारी संस्थांना कर्ज देऊं शकतें. भारताची आणि दरएक घटकाची पत कायम राहिली पाहिजे म्हणून घटकांच्या कर्ज काढण्याच्या अधिकारावर कांहीं प्रसंगीं संघसरकार अंकुश घालूं शकतें.

## मालमत्तेबाबतचे हक्क

ज्याप्रमाणें एक व्यक्ति किंवा भागीदारी किंवा कंपनी मालमत्ता धारण करूं शकते त्याप्रमाणेंच हिंदुस्थानसरकार व घटकसरकारें मालमत्ता

धारण करूं शकतात; आणि धारण करण्याप्रमाणें, विकणें, विकत घेणें, गहाण टाकणें, याहि गोष्टी करण्याचा सरकारांना हक्क आहे. तसेंच करार करणें किंवा करार करून घेणें हे जे नागरिकांचे हक्क आहेत तेहि सरकारला आहेत. घरें व धरणें बांधणें हें उदाहरण म्हणून देतां येईल. पार्लमेंटनें कायदा करून ठरवलें तर कांहीं उद्योगधंदेहि संघसरकार तसेंच घटकसरकार हातांत घेऊं शकेल. अशा तऱ्हेनें जें सरकार उद्योगपति होईल त्याच्यावर उद्योगपति–नागरिकाच्या सर्व जबाबदाऱ्या येऊन पडतील.

कोणचीहि मत्ता जर निवारसी होईल तर ती सरकारजमा होईल आणि सरकारची मत्ता समजली जाईल.

भारताच्या जलप्रांगणांतील समुद्राखालीं असणारीं सर्व खनिज द्रव्यें, मौल्यवान वस्तु आणि जमीन, यांचेवर संघाचें स्वामित्व आहे आणि संघसरकारच्या कामासाठीं त्यांचा उपयोग होईल.

राजानें अन्याय केला किंवा देणें बुडविलें तर त्याची दाद कशी लागावयाची ? इंग्लंडमध्यें प्रत्यक्ष राजावर कधींहि फिर्याद करतां येत नाहीं, पण मंत्र्यावर किंवा विशिष्ट अधिकाऱ्यावर फिर्याद करतां येते. हिंदुस्थानांत इंग्रजांचें जें राज्य स्थापन झालें तें राजाचें नसून ईस्टइंडिया कंपनीचे होतें. ईस्ट इंडिया कंपनीवर फिर्याद करतां येत असे. पुढें सन १८५८ सालीं ईस्ट इंडिया कंपनीचा अधिकार संपुष्टांत आला तेव्हां 'सेक्रेटरी ऑफ स्टेट इन कौन्सिल' या नांवाची कायदेशीर समष्टि निर्माण करण्यांत आली. सरकार-विरुद्ध दाद मागावयाची तर ईस्ट इंडिया कंपनीऐवजीं 'सेक्रेटरी ऑफ स्टेट इन् कौन्सिल' विरुद्ध फिर्याद करण्याची तरतूद त्या कायद्यानें केली. १९३५ च्या कायद्यानें ती समष्टि नष्ट केली आणि हिंदुस्थानसरकार व प्रांतिक सरकारें यांनाच वादी होण्याला समर्थ केलें. आपल्या नव्या घटनाकायद्यानें तीच व्यवस्था चालू ठेवली आहे असें म्हटलें तरी चालेल. संघसरकार व हरएक घटकसरकार दावा करूं शकेल आणि त्याच्यावर नागरिक अगर नागरिकांच्या संस्था दावे करूं शकतील. जसा कोणचाहि नागरिक कोर्टानें समन्स काढलें म्हणजे कोर्टापुढें जावयास बांधलेला आहे तद्वत् संघसरकार किंवा घटक-सरकारहि जावयास बांधलेलें आहे. फरक एवढाच कीं राष्ट्रपति, गव्हर्नर

किंवा राजप्रमुख स्वतः कोर्टापुढें जावयाचा नाहीं. सरकार आपल्या वतीनें वकील देईल किंवा एकाद्या अधिकाऱ्याला प्रतिनिधि म्हणून नेमील. कायद्यानें फक्त प्रजा बांधलेली आहे असें नव्हे तर राजा व त्याचे अधिकारी हेहि कायद्यानें बांधलेले आहेत हें सिद्ध करणारा सर्वात बळकट पुरावा असें या व्यवस्थेचें वर्णन करतां येईल.

हिंदुस्थानच्या नव्या घटनेंत राजा नाहीं व प्रजाहि नाहीं. नव्या म्हणजे स्वतंत्र भारतांत नागरिक आहेत आणि नागरिकांनीं नेमलेलें सरकार आहे. घटनाकायदा या बाबतींत समाधानकारक आहे. मात्र अजून लोकांना आपण 'प्रजा' आहोंत व आपलें 'मायबाप सरकार' आहे असेंच वाटत असतें.

---

## भाग तेरावा

# व्यापार व दळणवळण

घटनाकायद्याच्या एकोणिसाव्या कलमांत दोन मूलभूत हक्क जाहीर करण्यांत आले आहेतः [ १ ] भारत देशांत कोठेंहि निरंकुशपणें फिरण्याचा हक्क, व [ २ ] भारतांतील कोणत्याहि भागांत थोडे दिवस किंवा कायम वस्तीसाठीं रहाण्याचा हक्क. यालाच धरून कायद्याच्या तेराव्या भागांत व्यापार आणि दळणवळण यांसंबंधीं व्यवस्था तीनशें एक ते तीनशें सात या कलमांत सांगितलेली आहे. अखिल भारतीय व्यापार व दळणवळण अविच्छिन्नपणें चालू राहिले पाहिजेत असा नियम कलम ३०१ मध्यें घातलेला आहे. खरें सांगावयाचें म्हणजे हा नियम घालावयाची मुळींच आवश्यकता नव्हती. भारत हें एक राष्ट्र आहे आणि नागरिक शब्दाची व्याप्ति बदलण्याचा अधिकार फक्त संघराज्याच्या कायदेमंडळाला म्हणजे पार्लमेंटास आहे. १९४६ सालीं जी त्रिमंत्रियोजना प्रसिद्ध झाली होती तिच्या योगें संघराज्याचा अधिकार अगदीं मर्यादित झाला होता; पण त्या अत्यंत मर्यादित अधिकारामध्यें सुद्धां दळणवळणाच्या साधनांचा समावेश होता. एकराष्ट्रीयत्वाची एक निरपवाद खूण म्हणजे दळणवळणाचें स्वातंत्र्य होय. तेव्हां ३०१ कलमांतील व्यवस्था अवश्य होती असें नव्हे. पण त्या कलमांत अगदीं सुरवातीला जे शब्द घातलेले आहेत, त्यांमुळें या कलमाची आवश्यकता निर्माण झाली. अपवाद करण्याची सनद मिळविण्यासाठीं नियम केल्याचें हें उदाहरण आहे. मूलभूत हक्क मर्यादित करणारे कायदे बनविण्याचा मर्यादित अधिकार पार्लमेंटास आणि त्याहून संकुचित असा अधिकार घटकांच्या कायदेमंडळांस देण्याकरतांच हा भाग घटनाकायद्यांत समाविष्ट झाला आहे असें म्हटलें तरी चालेल.

### मर्यादा घालण्याचा अधिकार

निरनिराळ्या घटकांमधील दळणवळणाच्या व व्यापाराच्या स्वातंत्र्यावर किंवा भारताच्या कोणत्याहि भागांतील दळणवळणाच्या व व्यापाराच्या

स्वातंत्र्यावर मर्यादा घालणारा कायदा करण्याचा अधिकार पार्लमेंटास कलम ३०२ नें दिला आहे. घटनेच्या ३०३ कलमांतील दुसऱ्या पोट कलमानें पार्लमेंटास आणखी एक अधिकार दिला आहे. विशिष्ट परिस्थितींत भेद किंवा पक्षपात यांस मान्यता देणारा कायदा पार्लमेंट करूं शकेल. या अधिकाराची व्याप्ती ठरविणें फार कठीण आहे. पण एक दृष्टांत देऊन तिजबद्दल थोडी कल्पना देणें शक्य आहे. एखाद्या प्रांतांतील लोकांना तांदूळ खाण्याची पिढीजाद संवय आहे. त्या प्रांतांतून तांदूळ इतर प्रांतांत पाठविण्यास नेहमींची परवानगी आहे. एखाद्या वर्षी त्या प्रांतांत पिकलेला तांदूळ जेमतेम तेथील लोकांना पुरेसा आहे. अशा वेळीं त्या प्रांतांतील तांदूळ अन्य प्रांतांत पाठवावयास मनाई करणारा कायदा पार्लमेंट करूं शकेल.

कलम ३०४ नें घटकराज्यांच्या कायदेमंडळांना कांहीं अधिकार दिले आहेत त्यांची कल्पनाहि दाखला देऊन चांगली देतां येईल. समजा मुंबई इलाख्यांत कापडाच्या उत्पत्तीवर कर लादलेला आहे. इतर घटकांनीं तसा कर लादलेला नाहीं किंवा लादला असेल तरी मुंबई इलाख्यांतील करापेक्षां कमी आहे. अशा परिस्थितींत इतर घटकांतील कारखान्यांत बनलेला कपडा स्वस्त विकला जाईल आणि त्याचा परिणाम असा होईल कीं मुंबई इलाख्यांतील कपडा विकणें दुरापास्त होईल. अशा परिस्थितींत इतर घटकांत तयार झालेला माल मुंबई इलाख्यांत येत असतांना विषमता घालविण्यासाठीं अवश्य तेवढा कर त्याच्यावर लादण्याचा अधिकार मुंबईच्या कायदेमंडळाला कलम ३०४ नें दिला आहे. तसेंच सार्वजनिक हितासाठीं व्यापार व दळणवळण यांच्या स्वातंत्र्यावर आपल्या प्रदेशापुरता निर्बंध घालणारा कायदा करण्याचाहि अधिकार त्याच कलमानें घटकाच्या कायदेमंडळास दिला आहे. या अधिकाराचा फाजील उपयोग होऊं नये म्हणून त्याच्यावर कांहीं अटी लादल्या आहेत. कलम ३०४ नें दिलेला अधिकार वापरून जो कायदा करावयाचा असेल त्याचा मसुदा ( बिल ) कायदेमंडळापुढें मांडावयाच्या आधीं राष्ट्रपतींची परवानगी मिळवली पाहिजे. शिवाय कलम ३०७ मध्यें अशी व्यवस्था केली आहे कीं ३०४ कलमाची अंमलबजावणी करण्यासाठीं अंमलदार नेमण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे.

## जुन्या संस्थानांस सवलत

याशिवाय ३०५ व ३०६ कलमांनीं आणखी अपवाद केले आहेत. कलम ३०५ मध्यें असें फर्माविलें आहे कीं दळणवळण व व्यापार यांच्यावर अंकुश घालणारे जे कायदे ता. २६ जानेवारी १९५० रोजीं अस्तित्वांत होते ते चालू राहतील. मात्र त्यांत जरूर ते फेरफार करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस दिलेला आहे. कलम ३०६ मध्यें जुन्या देशी संस्थानांसंबंधीं अपवाद सांगितलेले आहेत. इंग्रजांच्या राजवटींत देशी संस्थानें एका तऱ्हेनें स्वतंत्र राज्यें होतीं. बाहेरून येणाऱ्या मालावर जकात बसविण्याचा अधिकार त्यांना होता आणि अशा जकातीमुळें वसूल होणारा पैसा त्या संस्थानांच्या नेहमीच्या उत्पन्नाचा एक महत्त्वाचा भाग होऊन बसलेला होता. या व्यवस्थेंत एकदम बदल करणें शक्य नाहीं व व्यवहार्यहि नाहीं; सबब दहा वर्षेंपर्यंत या जकाती चालू ठेवण्यास परवानगी दिलेली आहे. मात्र पांच वर्षांनंतर म्हणजे ता. २६ जानेवारी १९५५ नंतर ही सवलत नष्ट करण्याचा किंवा कमी करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस दिलेला आहे.

---

# भाग चौदावा

# पगारी अधिकारीवर्ग

हा भाग बड्या पगाराच्या सरकारी नोकरांसंबंधींचा आहे. खरें पाहिलें तर स्वतंत्र हिंदुस्थानच्या राज्यघटनेंत हा भाग घालण्याची अवश्यकता नव्हती. हा भाग मुळींच वाचला नाहीं तरी घटनेचें ज्ञान अपुरें रहाणार नाहीं. अमेरिकेंतील युनायटेड स्टेटसच्या घटनेंत असला भाग नाहीं. सन १९१९ पर्यंत जी घटना हिंदुस्थानांत चालू होती ती इंग्लंडच्या पार्लमेंटनें केलेली होती तरी सुद्धां 'सर्व्हिसीस'च्या विषयाला फक्त चार कलमें वाहिलेलीं होतीं आणि त्यांच्यासाठीं जेमतेम दीड पान खर्च होत असे. पुढें ज्यावेळीं द्विदल राज्यपद्धति अंमलांत आणली त्यावेळीं आणखी तीन कलमें वाढवण्यांत आलीं पण त्यांच्यासाठीं आणखी फक्त दोन पानें खर्चीं पडूं लागलीं. ज्या प्रमाणांत लोकप्रतिनिधींच्या हातांत जास्त जास्त अधिकार जाऊं लागला, त्या प्रमाणांत या प्रकरणाची लांबी वाढूं लागली. सन १९३५ च्या कायद्यांत या विषयानें २३२ ते २७७ इतकीं कलमें अडविलीं. त्या सर्वांचा इत्यर्थ लोकशाहीवर अविश्वास असा होता. आपल्या स्वतंत्र घटनेंत तितकीं नसलीं तरी ३०८ ते ३२३ इतकीं कलमें या विषयाला देण्यांत आलीं आहेत आणि त्यांच्यासाठीं रॉयल साइझचीं दहा पृष्ठें खर्चीं पडलीं आहेत. हा खर्च अनाठायीं आहे.

सनदी नोकर किंवा पगारी अंमलदार यांच्यासाठीं घटनेच्या कायद्यांत घालण्याजोगीं फक्त चार पांच कलमें आहेत आणि तीं इतर भागांत वांटून देतां आलीं असतीं. भाग तिसरा, अकरावा व एकोणिसावा या तीन भागांत हीं कलमें वांटतां आलीं असतीं. कोणाहि अंमलदाराची नेमणूक ज्या अधिकाऱ्यानें केली असेल त्याच्यापेक्षां कमी दर्जाच्या अधिकाऱ्यास त्या अंमलदाराला बडतर्फ करण्याचा अधिकार नाहीं. कोणाहि अंमलदारास शिक्षा करावयाची असेल तर तत्पूर्वी त्याची चौकशी झाली पाहिजे. राष्ट्रपति किंवा घटकराज्याचा शासक याची मर्जी असेतोंपर्यंतच संघाचा कोणीही अंमलदार किंवा घटकाचा कोणीही अंमलदार कामावर राहूं शकेल. पेन्शनबद्दलचे नियम पेन्शनरचा तोटा

होईल अशा तऱ्हेनें बदलतां कामा नयेत. अंमलदारांची नेमणूक होण्यापूर्वी लायक माणसांची एक यादी तयार करण्यांत आली पाहिजे व अशी यादी तयार करण्याचें काम पब्लिक सर्व्हिस कमिशनकडे देण्यांत आलें पाहिजे. एवढ्याच गोष्टी घटनेंत घालण्यालायक आहेत. याशिवाय घटनेंत घालण्याजोगी गोष्ट म्हणजे 'सर्व्हिसीस' संबंधीं कायदे करण्याचा अधिकार पार्लमेंटासच आहे असें एका कलमांत ग्रथित करावयास पाहिजे होतें. १९३५ च्या कायद्याची दाट छाया भारताच्या नव्या घटनेवर पडली आहे हें अनेक वेळां नमूद केलेलेंच आहे. या भागावर ती छाया घनदाट असून अनिष्ट तऱ्हेनें पडली आहे.

घटनेचा कायदा समजून घेण्याच्या दृष्टीनें या भागाबद्दल आणखी कांहींहि लिहिण्याची आवश्यकता नाहीं. वैयक्तिक स्वाभिमान व प्रामाणिकपणा कायद्यानें निर्माण होत नाहींत.

---

## भाग पंधरावा

# निवडणुकी

लोकशाही म्हटली म्हणजे प्रतिनिधींची निवडणूक ही फार महत्त्वाची बाब होऊन बसते. सर्व अधिकार लोकांपासून यावयाचा म्हणजे लोकांचें मत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें सरकारी कृतीमध्यें प्रतिबिंबित झालें पाहिजे. राष्ट्रपति काय, पार्लमेंट काय आणि घटकराज्यांतील कायदेमंडळें काय, यांना जो अधिकार आहे तो मूळचा लोकांचा. म्हणून पार्लमेंट आणि कायदेमंडळें यांचे सभासद लोकांनीं निवडून द्यावयाचे. या निवडणुकी निःपक्षपाती अधिकाऱ्यांमार्फत झाल्या तरच लोकांच्या मताचें खरें प्रतिबिंब त्यांत पडेल कोणचाहि पक्ष, मग तो कितीहि मोठा असो, म्हणजे राष्ट्र नव्हे. आज एक पक्ष सत्ताधिकारी आहे पण उद्यां दुसरा पक्ष सत्ताधिकारी होऊं शकेल, असें जेथें शक्य आहे तेथेंच लोकशाही वास करते. केवळ राजा नाहीं म्हणून लोकशाही प्रस्थापित झाली असें नाहीं. इंग्लंडमध्यें राजा असूनहि खरीखुरी लोकशाही त्या देशांत नांदते आणि रशियामध्यें राजा नाहीं तरी त्या देशांत हुकूमशाही धिंगाणा घालून राहिली आहे. आपल्या घटनेच्या प्रास्ताविक भागांत 'रिपब्लिक' या विशेष्याला 'डेमोक्रॅटिक' हें विशेषण लावण्याची आवश्यकता जी भासली ती यामुळेंच होय. एक पक्ष जर कायमचा सत्तारूढ होईल तर हुकूमशाही निर्माण झाल्याशिवाय रहात नाहीं. जर निवडणुकी मंत्रिमंडळाच्या आधीन राहिल्या तर सत्ताधारी पक्ष अशा तऱ्हेनें निवडणुकी घडवून आणील कीं तोच पक्ष पुनः बहुमतानें निवडून येईल. असें होऊं नये या उद्देशानें निवडणुकीसंबंधीं स्वतंत्र व्यवस्था आपल्या घटनाकायद्यांत केलेली आहे. घटनाकायद्यांत केलेल्या व्यवस्थेला धरून आणखी जरूर ती व्यवस्था पार्लमेंटनें कायद्याच्या द्वारा करावी असें घटना-कायद्यांतील कलम ३२७ मध्यें फर्मावलें आहे. त्याला अनुसरून गेल्या एप्रिल महिन्यांत पार्लमेंटानें 'रेप्रिझेंटेशन ऑफ धी पीपल ॲक्ट' पास केला.

घटनेच्या कायद्यांत ३२५ आणि ३२६ हीं दोन कलमें निवडणुकीच्या दृष्टया अत्यंत महत्त्वाचीं आहेत. सर्वसाधारण जनतेचा संबंध संघाच्या आणि घटकांच्या लोकसभांच्या निवडणुकीपुरता येतो. संघाचें कौंसिल हें अप्रत्यक्ष-पणें निवडलेल्या आणि राष्ट्रपतीनें नेमलेल्या सभासदांचें बनतें. घटकांचीं कौंसिलें म्हणजे अठरा धान्यांचीं कडबोळीं आहेत आणि त्यांचे सभासद जनतेकडून निवडले जाणार नाहींत. म्हणून त्यांच्याशीं जनतेचा प्रत्यक्ष संबंध येतच नाहीं. लोकसभांचे सभासद मात्र जनतेकडून प्रत्यक्ष निवडले जाणार.

## राष्ट्रीय दृष्ट्या महत्त्वाचा फरक

कलम ३२५ मध्यें असें फर्मावलें आहे कीं दरएक प्रादेशिक मतदारसंघाच्या मतदारांची एकच यादी होईल. धर्म, वर्ण, जात, अगर लिंग यांपैकीं कोण-च्याहि कारणानें कोणाचेंहि नांव त्या यादींतून वगळतां येणार नाहीं. ही अनुज्ञा अत्यंत महत्त्वाची आहे. भारत हें धर्मातीत राष्ट्र आहे हें स्पष्ट झालेलें आहे. आजपर्यंत हिंदुस्थानांत मुसलमान, ख्रिस्ती, ॲंग्लो-इंडियन, शीख, यांच्यासाठीं स्वतंत्र मतदारांच्या याद्या तयार कराव्या लागत, कारण इतके तुकडे आपल्या मतदारांचे होत असत. निवडणुकीसाठीं देशाचे प्रादेशिक विभाग हे पाडीत असतच, कारण तसे पाडणें अपरिहार्य होतें. पण त्याशिवाय एका प्रदेशांत धर्मवार व जातवार विभाग पाडणें भाग असे. इलेक्टोरेट आणि कॉन्स्टिटयुअन्सी या दोनहि इंग्रजी शब्दांना मराठींत 'मतदारसंघ' हा एकच शब्द वापरावा लागे आणि त्यामुळें अनेक वेळां घोटाळा होत असे. या विभागणीचे अत्यंत घातुक परिणाम झाले हें इतिहासप्रसिद्ध सत्य आहे. लॉर्ड मिंटोच्या वेळीं जें स्वतंत्र मतदारसंघाचें विषमय बीज हिंदुस्थानच्या राजकारणांत घुसलें त्याचा प्रचंड विषवृक्ष बनला आणि पाकिस्तानरूपी विषारी फळ त्या विषवृक्षावर आलें. मिंटोनंतर चेम्सफोर्ड आणि चेम्सफोर्डनंतर विलिंग्डन या व्हाईसरायांच्या कारकीर्दींत त्या विषवृक्षाची वाढ झाली. प्रथम मुसलमानांना थोड्या जागा स्वतंत्रपणें दिल्या गेल्यानंतर मुसलमानांना इतरांपासून वेगळे करण्यांत आले आणि मतदारसंघांना 'मुसलमान' आणि 'मुसलमानेतर' अशीं विशेषणें लावण्यांत आलीं. १९३५ च्या कायद्यानें तर

शीख, क्रिस्ती, अँग्लो-इंडियन, युरोपियन, इतक्या जातींसाठीं स्वतंत्र याद्या बनवल्या इतकेंच नव्हे तर हिंदूंमध्येंहि अस्पृश्य, मराठे, वगैरेसाठीं खास प्रतिनिधित्व मिळण्याची व्यवस्था केली. स्वतंत्र भारताच्या घटनाकायद्याच्या ३२५ व्या कलमानें ही सर्व फारकत नाहींशी केली असून फक्त प्रादेशिक विभाग ( कॉन्स्टिटयुअन्सी ) बनवण्याची तेवढी व्यवस्था केली आहे. हा फरक राष्ट्रीय दृष्टया फारच महत्त्वाचा आहे.

## स्त्री-पुरुषांचा स्वयंभू हक्क

कलम ३२६ मध्यें असें आज्ञापिलें आहे कीं वयांत आलेल्या दरएक स्त्री-पुरुषाला मताधिकार आहे. मात्र मताधिकार मिळण्यासंबंधीं कांहीं कायदे करण्याचा अधिकार पार्लमेंटास दिलेला आहे. वयांत येण्यासंबंधीं अशी व्यवस्था आहे कीं ज्याच्या वयाला एकवीस वर्षें पुरीं झालीं तो स्त्री वा पुरुष वयांत आला असें समजावें. दरएक मतदाराला फक्त एकाच प्रादेशिक यादींत नांव घालतां येईल आणि त्या प्रादेशिक विभागांत बारा महिन्याच्या काल-खंडांत १८० दिवसांची वस्ती केल्याचें सिद्ध केल्याशिवाय त्याचें नांव यादींत येणार नाहीं. एवढे गुणधर्म सिद्ध झाले म्हणजे मतदारांच्या यादींत त्या पुरुषाचें वा स्त्रीचें नांव दाखल झालेंच पाहिजे. पार्लमेंट वा घटकाचें कायदेमंडळ कायदे करून कांहीं गुन्हेगारांना आणि वेड्या माणसांना मतदारांच्या यादींतून वगळूं शकेल. वयांत आलेल्या दरएक स्त्री-पुरुषाचा हा स्वयंभू हक्क म्हणून मान्य करण्यांत आला आहे. कांहीं लोकांना याबद्दल शंका वाटत असते, या शंकेची दखल खुद्द डॉ. राजेंद्रप्रसाद यांनीं सुद्धां घेतली. सुदैव एवढेंच कीं ते स्वतः या शंकेखोरांत मोडत नाहींत. त्यांनीं सार्वत्रिक मताधिकाराचें समर्थन केलें आहे. सार्वत्रिक मताधिकार हा तर भारताच्या नव्या घटनेला सर्वात मोठा आधार प्राप्त झालेला आहे. हा सर्वोत्कृष्ट दागिना नव्हे तर हें वरिष्ठ सामर्थ्य आहे. या मताधिकाराबद्दल शंका घेणारे लोक म्हणजे लोकांच्या स्वयंभू हक्काबद्दल शंका घेणारे लोक होत. कलम ३२६ नें या शंकाकुशंकांची वासलात लावली आहे. घटनेच्या कायद्यानें प्रौढ मताधिकाराचा हक्क प्रस्थापित केला आहे. कलम ३२५ आणि कलम ३२६ हीं दोन कलमें या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचीं आहेत.

कलम ३२५ मधील व्यवस्था निरपवाद आहे. दुर्दैवानें कलम ३२५ मधील व्यवस्थेला कांहीं अपवाद घटनाकायद्याच्या सोळाव्या भागांत सांगितले आहेत. हरिजन आणि आदिवासी यांच्यासाठीं पार्लमेंटाच्या व घटकांतील कायदेमंडळांच्या लोकसभांमध्यें कांहीं जागा राखून ठेवण्यांत आल्या आहेत. हरिजन किंवा आदिवासी यांचें जें लोकसंख्येंत प्रमाण असेल त्याच प्रमाणांत त्यांच्यासाठीं जागा राखून ठेवण्यांत आल्या आहेत. हें आपल्या लोकशाहीच्या शुभ्र मुखमंडळावरील गालबोट आहे. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट अशी कीं, दहा वर्षांनीं या राखीव जागा नष्ट होतील. आसामधील कांहीं प्रदेशासाठीं जागा राखल्या आहेत. पण त्यांच्यासंबंधीं तक्रारीला जागा नाहीं कारण त्या भौगोलिक विभागांसाठीं राखलेल्या आहेत.

आपल्या देशाचे प्रादेशिक विभाग पाडण्यासंबंधीं व्यवस्था करण्याचा अधिकार पार्लमेंटास देण्यांत आला आहे आणि ती व्यवस्था करण्यासाठीं पार्लमेंटानें कायदा पास केलाहि आहे.

## 'इलेक्शन कमिशन'चें कार्य

हे सगळे कायदे झाले, घटना कायद्यांतहि ३२५ व ३२६ कलमांनीं स्तुत्य अशी व्यवस्था केली. पण या सर्व कायदेकानूंची अंमलबजावणी निःपक्षपातीपणानें झाली पाहिजे म्हणून कलम ३२४ मध्यें असें फर्माविलें आहे कीं, राष्ट्रपतीनें एक इलेक्शन कमिशन नेमावें. मतदारांच्या याद्या तयार करणें, निवडणुकी करणें आणि निवडणुकीसंबंधीं कांहीं तक्रारी उत्पन्न झाल्या तर त्यांची चौकशी करून निकालांत काढण्यासाठीं अदालती नेमणें, हीं सर्व कामें त्या इलेक्शन कमिशननें करावीं. कलम १०३ आणि १९२ यांमध्यें इलेक्शन कमिशनकडे आणखी एक अधिकार सोंपवला आहे. घटनाकायद्याखालीं एकाद्या सभासदाचें सभासदत्व रद्द होतें कीं काय असा प्रश्न उपस्थित झाला तर त्याचा निर्णय देण्याचा अधिकार संघराज्यापुरता राष्ट्रपतीकडे आणि घटकराज्यापुरता गव्हर्नराकडे आहे. पण हा अधिकार वापरण्याच्या वेळीं राष्ट्रपतीनें काय किंवा गव्हनरानें काय आपल्या मंत्रिमंडळाचा सल्ला घ्यावयाचा नसून इलेक्शन कमिशनचा सल्ला घ्यावयाचा आहे. या दोनहि कलमांतील दुसऱ्या

पोटकलमांत अशी स्पष्ट आज्ञा केलेली आहे कीं इलेक्शन कमिशनच्या सल्या-प्रमाणेंच राष्ट्रपतीनें किंवा गव्हर्नरानें हुकूम दिला पाहिजे. निवडणुकीपुरता सवतासुभा घटनेच्या कायद्यानें केलेला आहे. पुनरुक्ति करून असें स्पष्ट केलें जात आहे कीं, ही व्यवस्था केवळ निवडणुकी निःपक्षपातीपणें केल्या जाव्या, मंत्रिमंडळाला त्यांत ढवळाढवळ करतां येऊं नये, जनतेचें सर्वाधिकारित्व पक्षाच्या रगाड्यांत पिळलें जाऊं नये, या उद्देशानें केलेली आहे. राष्ट्रपति आणि संघाचा उपाध्यक्ष यांच्या निवडणुकीसंबंधींची व्यवस्था सुद्धां या कमिशनच्या हातांत आहे.

इलेक्शन कमिशनमध्यें एक मुख्य कमिशनर असेल आणि जरूर तितके अन्य कमिशनर असतील. अन्य कमिशनर किती असावे हें राष्ट्रपतीनें ठरवावयाचें आहे. यासंबंधीं पार्लमेंटनें कायदा केला असेल त्याला अनुसरून इलेक्शन कमिशनच्या सर्व सभासदांच्या नेमणुका करण्याचा अधिकार राष्ट्रपतीचा आहे. मुख्य कमिशनर हा कमिशनचा अध्यक्ष असेल. एका कमिशनकडून सर्व काम उरकणार नाहीं म्हणून निवडणुकीच्या कामासाठीं प्रादेशिक कमिशनर नेमण्याचा अधिकार राष्ट्रपतीला आहे, मात्र हा अधिकार वापरतांना राष्ट्रपतीनें इलेक्शन कमिशनचा सल्ला घेतला पाहिजे.

या कमिशनचें काम करणारावर मंत्रिमंडळाचें दडपण येऊं नये म्हणून मुख्य कमिशनरला सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधिशाइतकेंच संरक्षण दिलेलें आहे. सुप्रीम कोर्टाच्या एकाद्या न्यायाधिशाला काढावयाचा झाला तर ज्या गोष्टी केल्या पाहिजेत त्या केल्याशिवाय मुख्य कमिशनरला कामावरून काढतां येणार नाहीं. तसेंच मुख्य कमिशनरच्या शिफारशीशिवाय इतर कमिशनर किंवा प्रादेशिक कमिशनर यांस कामावरून काढतां येणार नाहीं.

मुख्य कमिशनर, इतर कमिशनर आणि प्रादेशिक कमिशनर यांना पगार, भत्ता, रजा, वगैरे काय मिळावे हें पार्लमेंटानें कायदा करून ठरवावें. पार्लमेंटानें तसा कायदा केला नाहीं तर या सर्व गोष्टी ठरवण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. या सर्व अधिकाऱ्यांची लायकी काय असावी यासंबंधीं कायदा करण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे. पण पार्लमेंटानें जर जरूर तो कायदा केला नाहीं तर राष्ट्रपती आपल्या मर्जीस येईल त्याला नेमूं शकेल.

घटनाकायद्यांत दिलेले यमनियम (does and don'ts) संभाळून निवडणुकीसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार पार्लमेंटास दिलेला आहे. विशेषें-करून मतदारांच्या याद्या तयार करणें आणि देशाचे प्रादशिक विभाग पाडणें या गोष्टी कायदा करून पार्लमेंटानें ठरवावयाच्या आहेत. जर पार्लमेंटानें सर्व देशासाठीं कायदा केला नाहीं अगर केलेला कायदा अपूर्ण असेल तर दरएक घटकाच्या कामदेमंडळाला आपल्या प्रदेशापुरती व्यवस्था कायद्याच्या द्वारा करण्याचा अधिकार आहे.

पार्लमेंट आणि कायदेमंडळें यांच्या निवडणुकीच्या बाबतींत कोर्टांना ढवळाढवळ करतां येऊं नये असा आपली घटना बनवणारांचा कटाक्ष दिसतो. कलम ३२९ मध्यें अशी आज्ञा केलेली आहे कीं प्रादेशिक विभाग पाडण्यासंबंधीं आणि एका विभागानें किती प्रतिनिधि निवडावे यासंबंधीं जे कायदे पार्लमेंटाने अगर घटकाच्या कायदेमंडळांनीं केले असतील त्या कायद्यांबद्दल कोर्टात तक्रार चालावयाची नाहीं. तसेंच कोणत्याहि निवडणुकीच्या निकालाबद्दल तक्रार करावयाची झाली तर ती कायद्याच्या साधारण कोर्टापुढें करतां यावयाची नाहीं. अशा तक्रारींची चौकशी करून त्यांचा निवाडा करण्यासाठीं जीं खास कोर्टें नेमली जातील त्यांच्यापुढेंच असल्या तक्रारी नेतां येतील.

राष्ट्रपतीनें मुख्य इलेक्शन कमिशनरची नेमणूक केलेली आहे. इतर कमिशनरांच्या नेमणुका झाल्याचें प्रसिद्ध झालें नाहीं असें वाटतें. प्रादेशिक कमिशनर नेमलेले नसावेत. यापूर्वी जें मतदार नोंदणीचें काम झालें तें पार्लमेंटानें आपल्या कायद्यांत मान्य करून घेतलें आहे. जरूर असलेला आणखी कायदा पार्लमेंट घडवीत आहे. आणखी मतदारांची नोंदणी चालू आहे. निवडणुकीसाठीं जे प्रादेशिक विभाग पाडावयाचे आहेत त्यांसंबंधीं काम चालू आहे. लोकांनीं या कामीं जागरूकता दाखविली पाहिजे. कायदा उत्तम असला तरी त्याची योग्य अंमलबजावणी होणें हे अखेर जनतेच्याच हातीं आहे.

---

## भाग सोळावा

# कांहीं वर्गांसाठीं खास व्यवस्था

घटनाकायद्याच्या ४६ व्या कलमांत असें फर्माविलें आहे कीं हरिजन आणि आदिवासी यांना सामाजिक अन्याय व कोणत्याहि प्रकारची पिळवणूक यांपासून सरकारनें बचाविलें पाहिजे. ही जी सर्वसाधारण जवाबदारी सरकारावर टाकण्यांत आली आहे तिचें जास्त विस्तृत स्पष्टीकरण सोळाव्या भागांत केलेलें आहे. या भागांत ३३० ते ३४२ कलमांचा समावेश आहे. या वर्गाच्या जोडीला अँग्लोइंडियन जमातीलाहि कांहीं सवलती दिलेल्या आहेत.

यापूर्वींच दोनवेळां सांगून झालें आहे कीं दहा वर्षेपर्यंत हरिजन व आदिवासी यांच्यासाठीं संघाच्या व घटकांच्या लोकसभेमध्यें जागा राखून ठेवलेल्या आहेत. एकंदर लोकसंख्येंत हरिजन व आदिवासी यांचें जें प्रमाण आहे त्याच प्रमाणांत लोकसभांमध्यें त्यांच्यासाठीं जागा राखलेल्या आहेत. आसाममध्यें तर तेथील आदिवासी लोकांचे स्वतंत्र व स्वायत्त जिल्हे आहेत. अँग्लोइंडियन जमातीसाठीं जरा निराळी व्यवस्था आहे. त्यांच्यासाठीं संघाच्या लोकसभेंत अशी व्यवस्था आहे कीं जर अँग्लोइंडियन प्रतिनिधी पुरेशा प्रमाणांत निवडून आले नाहींत तर राष्ट्रपतीनें एक किंवा दोन अँग्लो-इंडियन सभासद नेमावे. घटकांसाठीं अशी व्यवस्था आहे कीं जर कोणत्याहि घटकाच्या लोकसभेंत पुरेसे अँग्लो-इंडियन प्रतिनिधी निवडून आले नाहींत तर घटकाच्या गव्हर्नरनें किंवा राजप्रमुखानें योग्य तितके अँग्लो–इंडियन सभासद नेमावे.

केवळ कायदे करणाऱ्या संस्थांमध्यें प्रतिनधित्व मिळाल्यानें हरिजन, आदिवासी किंवा अँग्लो–इंडियन यांचें पुरेसें हितसंरक्षण होणार नाहीं म्हणून शिक्षण आणि सरकारी नोकऱ्या यांसंबंधीं खास व्यवस्था कांहीं कालपर्यंत घटनेच्या कायद्यांत आज्ञापिली आहे. अँग्लो–इंडियनांना ता. १५ ऑगस्ट १९४७ पर्यंत ज्या प्रमाणांत रेल्वे, कस्टम, पोस्ट व तार या खात्यांत नोकऱ्या मिळत होत्या त्या प्रमाणांत २६ जानेवारी १९५२ पर्यंत मिळत रहाव्या

अशी व्यवस्था करून दर दोन वर्षांनीं हें प्रमाण कमी कमी करीत आणून दहा वर्षांत ही सवलत अजिबात नाहींशी करण्यांत यावी असें फर्माविलें आहे. अॅंग्लो–इंडियनांच्या शिक्षणसंस्थानांहि दहा वर्षेपर्यंत ग्रँट मिळण्याच्या बाबतींत विशेष हक्क ठेविले आहेत.

हरिजन आणि आदिवासी या जमातींतील व्यक्तींना न्यायानें सरकारी नोकरींतील जागा मिळतील इकडे सरकारनें लक्ष द्यावें असें कलम ३३५ मध्यें स्पष्टपणें फर्माविलें आहे. हरिजन व आदिवासी यांच्यासाठीं एक खास अंमलदार नेमण्याचा अधिकार राष्ट्रपतीस दिलेला आहे. या दोन जमातींना जे हक्क व सवलती दिलेल्या आहेत त्यांचा उपभोग त्यांना नीटपणें घेतां येतो आहे किंवा नाहीं, यासंबंधीं चौकशी करून राष्ट्रपतीकडे अहवाल पाठविणें हें या अधिकाऱ्याचें मुख्य काम आहे. राष्ट्रपतीनें हे अहवाल पार्लमेंटापुढें ठेवलेच पाहिजेत. या दोन वर्गाशिवाय दुसऱ्या कांहीं मागासलेल्या जातींबद्दल आणि अॅंग्लो–इंडियन जातीबद्दलहि चौकशी करण्याचें काम राष्ट्रपती या अधिकाऱ्याकडे सोपवूं शकेल.

ता. २६ जानेवारी १९६० नंतर, आदिवासी वस्तीच्या प्रदेशाचा कारभार कसा चालला आहे याची चौकशी करण्यासाठीं एक कमिशन राष्ट्रपतीनें नेमिलें पाहिजे. त्या तारखेच्या आधींसुद्धां या कामासाठीं कमिशन नेमण्याचा अधिकार राष्ट्रपतीला आहे. या वर्गातील लोकांचें हित–संवर्धन करण्यासाठीं कोणत्या योजना अंमलांत आणल्या पाहिजेत त्यांसंबंधीं घटकराज्यांच्या सरकारांना आज्ञापत्रक काढण्याचा अधिकार संघसरकारला देण्यांत आला आहे. सामाजिक व शैक्षणिक दृष्टया मागासलेल्या वर्गाची पहाणी करून त्यांची स्थिति सुधारण्यासाठीं व त्यांच्या मार्गात येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठीं काय केलें पाहिजे याबद्दल शिफारशी करण्यासाठीं कमिशन नेमण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. जरूर ती चौकशी करून कमिशननें त्यांच्या निदर्शनास आलेल्या सर्व गोष्टी आणि आपल्या शिफारशी नमूद करणारा अहवाल तयार करून राष्ट्रपतीकडे पाठविला पाहिजे. त्या अहवालाची प्रत राष्ट्रपतीनें पार्लमेंटाच्या दोनहि सभांपुढें ठेविली पाहिजे आणि संघसरकारनें त्या अहवालांतील शिफारशींना अनुसरून काय काय केलें आहे यासंबधींचें निवेदनहि राष्ट्रपतीनें पार्लमेंटाच्या दोनहि सभागृहांपुढें ठेविलें पाहिजे.

---

# भाग सतरावा

# राष्ट्रभाषा

घटनाकायद्याच्या सतराव्या भागांत ३४३ ते ३५१ या कलमांचा समावेश आहे. हीं कलमें सरकारी भाषासंबंधीं आहेत. यांपैकीं पहिलीं दोन कलमें संघराज्याच्या भाषेसंबंधीं आहेत. देवनागरी लिपींत लिहिलेली हिंदी ही भारताची राष्ट्रभाषा ठरली आहे. आंतरराष्ट्रीय पद्धतीनें लिहिलेले हिंदी आंकडे सर्व सरकारी कामासाठीं वापरण्यांत येतील. सुरुवातीचीं पंधरा वर्षे म्हणजे ता. २६ जानेवारी १९६५ पर्यंत इंग्रजी भाषेचा उपयोग सर्व प्रकारच्या सरकारी कामासाठीं चालू राहील. पण या मुदतींत इंग्रजीच्या जोडीला हिंदी भाषेचाहि उपयोग करण्यास परवानगी देण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. पंधरा वर्षांनंतर सुद्धां विशिष्ट कामासाठीं इंग्रजी भाषेचा उपयोग करावयास परवानगी देण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे.

## चौदा भाषा-प्रतिनिधींचें कमिशन

ता. २६ जानेवारी १९५५ नंतर आणि पुनः ता. २६ जानेवारी १९६० नंतर राष्ट्रपतीनें एक राष्ट्रभाषा कमिशन नेमलें पाहिजे. या कमिशनवर प्रमुखाच्या जोडीला घटनेंत मान्य केलेल्या चौदा भाषांचे प्रतिनिधि नेमिले गेले पाहिजेत. घटनेंत मान्य केलेल्या चौदा भाषा पुढें दिल्या आहेतः ( १ ) आसामी ( २ ) बंगाली ( ३ ) गुजराथी ( ४ ) हिंदी ( ५ ) कानडी ( ६ ) काश्मिरी ( ७ ) मल्याळी ( ८ ) मराठी ( ९ ) उडिया ( १० ) पंजाबी ( ११ ) संस्कृत ( १२ ) तामीळ ( १३ ) तेलगू ( १४ ) उर्दू. या कमिशननें पुढें नमूद केलल्या बाबींची चौकशी करून त्यांसंबंधीं आपल्या शिफारशी राष्ट्रपतीस सादर केल्या पाहिजेतः—

( १ ) भारतांत सरकारी कामासाठीं हिंदी भाषेचा दिवसेंदिवस वाढता उपयोग कसा करतां येईल;

(२) सरकारी कामासाठीं इंग्रजी भाषेचा उपयोग दिवसेंदिवस कसा कमी करतां येईल;

(३) पार्लमेंट, घटकांचीं कायदेमंडळें, सुप्रीम (वरिष्ठ) कोर्ट, आणि हाय कोर्टें यांच्या कामकाजासाठीं कोणती भाषा वापरण्यांत यावी;

(४) सरकारी कामासाठीं आंकडे लिहिण्याची कोणती पद्धति चालू ठेवावी किंवा सुरू करावी;

(५) संघसरकारची सरकारी भाषा, आणि संघसरकार व घटकसरकार यांनीं परस्परांशीं व्यवहार करतांना वापरण्याची भाषा यांसंबंधीं राष्ट्रपतीनें कमिशनकडे सोंपविलेला कोणताहि प्रश्न.

भारताच्या औद्योगिक, सांस्कृतिक व शास्त्रीय प्रगतीचा, तसेंच हिंदीशिवाय अन्य भाषा बोलणाऱ्या घटकराज्यांतील लोकांच्या भाषाविषयक हक्कांचा, नीट विचार करून कमिशननें शिफारशी तयार केल्या पाहिजेत.

पार्लमेंटाच्या कौन्सिलनें आपल्यामधून निवडलेले दहा सभासद, आणि लोकसभेनें आपल्यामधून निवडलेले वीस सभासद मिळून सभासदांची एक कमिटी बनविण्यांत येईल. राष्ट्रपतीनें नेमिलेल्या कमिशनच्या शिफारशींचा विचार करून या कमिटीनें आपलें मत राष्ट्रपतीस कळविलें पाहिजे. या कमिटीच्या मताचा विचार करून त्याप्रमाणें हुकूम जाहीर करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे.

दरएक घटकराज्याच्या कायदेमंडळास त्या राज्याची सरकारी भाषा कोणती असावी हें ठरविण्याचा अधिकार आहे. हिंदी किंवा दुसरी एकादी भाषा, किंवा दुसऱ्या अनेक भाषा त्या त्या घटकापुरत्या सरकारमान्य ठरविणें हें कायदेमंडळाच्या अधिकारांत येतें. यासंबंधीं कायदेमंडळानें जोंपर्यंत कायदा केला नाहीं तोंपर्यंत ज्या कामांसाठीं ता. २६ जानेवारी १९५० पूर्वी इंग्रजी भाषेचा उपयोग केला जात होता त्या कामांसाठीं तो चालू राहील.

कोणत्याहि घटकराज्यांत एकादी भाषा बोलणारांची संख्या बरीचशी असेल आणि त्या लोकांकडून राष्ट्रपतीकडे मागणी येईल तर योग्य ती चौकशी

करून त्या भाषेला त्या घटकराज्यांत मान्यता मिळाली पाहिजे असा हुकूम काढण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. कलम २९ पोटकलम १ मध्यें अशा लोकांच्या भाषिक हक्कांचें संरक्षण करण्यासंबंधीं तरतूद आहे.

पार्लमेंटनें कायदा करून अन्य व्यवस्था केली नाहीं तोंपर्यंत सुप्रीम कोर्टाची व हायकोर्टाची भाषा इंग्रजी हीच राहील; तसेंच पार्लमेंट, घटकांचीं कायदेमंडळें, यांच्यापुढें येणाऱ्या कामकाजासंबंधीचे कागद, पार्लमेंटनें केलेले कायदे, घटकाच्या कायदेमंडळांनीं केलेले कायदे, राष्ट्रपतींनें, गव्हर्नरानें व राजप्रमुखानें जाहीर केलेले वटहुकूम (ऑर्डिनन्सेस), घटनेच्या कायद्याखालीं अगर पार्लमेंटानें तसेंच घटकांच्या कायदेमंडळांनीं केलेल्या कायद्यांखालीं काढलेले सर्व हुकूम व पोटनियम, इंग्रजी भाषेंतच प्रसिद्ध झाले पाहिजेत.

एखाद्या घटकराज्यांतील हायकोर्टापुढें जें कामकाज चालतें त्यांत हिंदी अगर घटकराज्यांत मान्य असलेली भाषा वापरावयास परवानगी देण्याचा अधिकार गव्हर्नरास किंवा राजप्रमुखास आहे. मात्र अशी परवानगी देण्यापूर्वी राष्ट्रपतीची संमति मिळविली पाहिजे. या परवानगीचा हायकोर्टाच्या निर्णयाच्या, हुकूमनाम्याच्या वा हुकुमाच्या भाषेवर परिणाम होऊं शकणार नाहीं; म्हणजे पार्लमेंटानें कायदा केला नाहीं तोंवर इंग्रजी भाषाच वापरावी लागणार.

लोकांनीं सरकारकडे वा सरकारी अधिकाऱ्यांकडे करावयाचे जे अर्ज त्यांत इंग्रजी किंवा हिंदी भाषा वापरली पाहिजे अशी सक्ती करतां येणार नाहीं.

कलम ३५१ मध्यें हिंदीभाषेच्या वृद्धीसंबंधीं विशेष सूचना केलेली आहे. त्या कलमाचें श्री. देवगिरीकर यांनीं केलेलें भाषांतर पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

"हिंदी भाषेचा विस्तार करणें, भारताच्या संमिश्र संस्कृतींतील सर्व घटकांच्या विचारप्रदर्शनाचें माध्यम म्हणून उपयोग होण्याकरतां तिचा विकास करणें, तिच्या स्वाभाविक वळणाला अडथळा येऊं न देतां हिंदुस्थानींतील आणि आठव्या परिशिष्टांत दिलेल्या अन्य भाषांतील घडण, धाटणी आणि प्रयोग, हे आपलेसे करून ती भाषा संपन्न करणें आणि जेथें अवश्य किंवा इष्ट असेल तेथें त्या भाषेच्या शब्दसंग्रहाकरतां मुख्यतः संस्कृत आणि नंतर इतर भाषांच्या भांडाराचा उपयोग करणें हें संघाचें कर्तव्य असेल."

# भाग अठरावा

# आणीबाणीच्या कालांतील व्यवस्था

घटनेच्या अठराव्या भागांत ३५२ ते ३६० कलमांचा समावेश होतो. या भागाचें शीर्षक 'आणीबाणीच्या कालांतील व्यवस्था' असें आहे. हा भाग म्हणजे संकटवाद आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. जनतेवरील अविश्वास या भागांत जितक्या स्पष्टपणें दिसतो तितका इतर कोणत्याहि भागांत दिसत नाहीं. सरकार जनतेहून वरिष्ठ आहे, लोकांच्या स्वायत्ततेपेक्षां राज्यकर्त्यांचें स्थैर्य अधिक मोलाचें आहे, लोकशाही किंवा घटनेचा कायदा यांचें रक्षण लोक करूं शकणार नाहींत तर फक्त संघसरकारचें मंत्रिमंडळ करूं शकेल, हे आणि असले सिद्धांत अप्रत्यक्षपणें ग्रथित करणारीं अशींच हीं नऊ कलमें आहेत. घटक राज्याविरुद्ध संघाची चढाई, स्वयंभू व्यक्तीविरुद्ध मंत्रिमंडळ या समष्टीची लढाई, न्यायकोर्टावर नोकरशाहीची तात्पुरती मात–या सर्वाचें स्पष्ट प्रदर्शन या भागांत आहे. ब्रिटिश राजवटीची सावली या भागावर फारच मोठ्या प्रमाणावर पडली आहे, आणि कांहीं बाबतींत ब्रिटिशांच्या पुढेंहि पाऊल टाकण्यांत आलें आहे. 'लोक आणि लोकसेवक' हें नातें नष्ट करून 'राजा आणि प्रजा' हें नातें पुनः तात्पुरतें कां होईना प्रस्थापित करणारा हा भाग आहे.

## स्वदेशी प्रतिष्ठितपणा

१९३५ च्या कायद्यांत आणीबाणीच्या परिस्थितीला तोंड देण्यासाठीं जी व्यवस्था सांगितली आहे ती चारच कलमांत सांगून झाली आहे. त्यांपैकीं ९३ कलम हें लोकांच्या जास्तीत जास्त परिचयाचें झालें होतें; कारण जवळजवळ साडेसहा वर्षे हिंदुस्थानच्या दोन तृतीयांश भागांत या कलमाप्रमाणेंच कारभार चालला होता. याशिवाय ४५, १०२ आणि १२६ अ, हीं कलमें त्याच उद्देशानें घातलेलीं होती. त्यांपैकीं कलम १२६ अ हें तर दुसऱ्या महायुद्धाची पूर्वतयारी म्हणून ब्रिटिश पार्लमेंटानें पास केलें होतें. हीं कलमें १९३५ च्या कायद्यांत निरनिराळ्या भागांत आलीं आहेत.

आमच्या नव्या घटनाकायद्यांत त्यांना स्वतंत्र भागांत आणून त्यांत भर घालून त्यांना प्रतिष्ठितपणाचा दर्जा प्राप्त करून दिला आहे. हायकोर्ट किंवा फेडरल कोर्ट यांचे अधिकार कोणत्याहि प्रकारें मर्यादित करण्याचा अधिकार १९३५ च्या कायद्यानें गव्हर्नरजनरल किंवा गव्हर्नर यास दिला नव्हता. आपल्या नव्या घटनाकायद्यानें कलम ३५९ द्वारा सुप्रीमकोर्ट आणि हायकोर्टें यांना अनुक्रमें कलम ३२ आणि कलम २२६ यांपासून मिळालेले अधिकार तात्पुरते लटकत ठेवण्याचा अधिकार राष्ट्रपतीला म्हणजेच संघराज्याच्या मंत्रिमंडळाला दिला आहे. हुकुमशाहीचा हा प्रकार संभावितपणाचा दिसावा म्हणून जें एक कलम नेहमींच्या भागांत कुठेंतरी घालावयास पाहिजे होतें तें आणीबाणीच्या भागांत समाविष्ट केलें आहे. हें कलम ३५५ वें असून त्याचें श्री. देवगिरीकर यांनी केलेलें भाषांतर पुढें देण्यांत येत आहे:—

" ३५५. प्रत्येक राज्याचें परकीय आक्रमणापासून आणि अंतर्गत अशांततेपासून रक्षण करणें आणि प्रत्येक राज्याचें सरकार या घटनेंतील व्यवस्थेनुरूप चालू राहील असें आश्वासन देणें हें संघाचें कर्तव्य असेल."

" आश्वासन देणें " या शब्दांनीं इंग्रजी कायद्यांत असलेल्या 'ensure' या शब्दाचें पुरेसें भाषांतर होत नाहीं. नुसतें आश्वासन देण्याचें संघाचें कर्तव्य नाहीं तर त्या आश्वासनानुसार कृति करणें हें संघसरकारचें कर्तव्य आहे असा या कलमाचा अर्थ आहे.

## कलम ३५५ चा उद्देश.

हें म्हणजे ३५५ वें कलम पांचव्या भागांत ७३ व्या कलमानंतर लगेच यावयास पाहिजे होतें. प्रत्येक घटकराज्याचा कारभार घटनेंतील व्यवस्थेप्रमाणें चालविण्याची जबाबदारी जर संघसरकारवर टाकावयाची तर ती फक्त आणीबाणीच्या वेळीं टाकण्याचा उद्देश घटनाकायद्याचा मुळींच नाहीं. हें कर्तव्य कायम स्वरूपाचें आहे. घटनेचे कायदे वाचण्याची ज्यांना थोडी सुद्धां संवय आहे त्यांना या कलमाची भाषा आणि या भागांतील इतर कलमांची भाषा यांमधील फरक सहज लक्षांत येईल. कलम ३५५ पास झाल्यावर कंपॉझिटरनें त्याला या भागांत स्थान दिलें असें म्हटलें तर कोणीहि रागाच्या आहारीं जाण्याचें कारण नाहीं. अमेरिकेच्या घटनेच्या

चवथ्या कलमांतील चवथ्या पोट कलमावरून हें ३५५ वें कलम सुचलेलें आहे. पण अमेरिकन घटनेमध्यें तें आणीबाणीच्या कालापुरतें नसून कायमचें ग्रथित केलेलें आहे. वर दिलेलें श्री. देवगिरीकरांचें भाषांतर वाचणाऱ्या दरएकाची अशी खात्री होईल कीं या कलमांत ग्रथित केलेलें कर्तव्य संघसरकारनें फक्त आणीबाणीच्या वेळीं बजावावयाचें नसून नेहमींच बजावावयाचें आहे. असें असून त्याला या भागांत जागा दिली आहे. या भागाचा संभावितपणा वाढविण्याच्या उद्देशानें हें कलम त्यांत घातलें असेल तर मात्र कंपॉझिटरनें तें घातलें असें म्हणतां येणार नाहीं.

अमेरिकन घटनेंतील कलमाची भाषा आणि आपल्या घटनेंतील ३५५ व्या कलमाची भाषा यांची तुलना केल्यास एक महत्त्वाची गोष्ट नजरेस येण्याजोगी आहे. अमेरिकन घटनेंत फर्माविलें आहे कीं, ' रिपब्लिक ' म्हणजे ' जन-सत्ताक ' राज्य दरएक घटकांत अविच्छिन्नपणें चालू राहील असें करणें हें संघाचें कर्तव्य आहे. आपल्या ३५५ व्या कलमामध्यें, घटनेंतील व्यवस्थेनुरूप कारभार चालू ठेवण्याचें कर्तव्य संघाच्या माथीं मारलें आहे. याचा अर्थ असा होतो कीं ' ब ' वर्गातील संस्थानांत किंवा राज्यांत ' रिपब्लिक ' स्थापन होऊं न देण्याची जबाबदारी भारताच्या संघसरकारवर टाकली आहे. आतां हें कलम अठराव्या भागांत असल्यामुळें राष्ट्रपतींनीं आणीबाणीचा जाहीरनामा प्रसिद्ध केल्याशिवाय या कलमाची अंमलबजावणी होऊं शकणार नाहीं, अतएव अन्यकालीं राजप्रमुखाला घालवून देण्याचा लोकांना हक्क आहे असा जर कोणी आक्षेप काढील तर भारताचे कायदामंत्री व मुख्य वकील काय उत्तर देतील हें पहावें लागेल.

## आणीबाणीचा जाहीरनामा

या म्हणजे अठराव्या भागांतील पहिलें कलम म्हणजे घटनेच्या कायद्यां-तील ३५२ वें कलम आहे. आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली आहे असा जाहीरनामा काढण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे असें या कलमांत सांगितलें आहे, म्हणजे संघाच्या मंत्रिमंडळास आहे. युद्ध, किंवा बंड, किंवा फार मोठ्या प्रमाणांत अशांतता, यांना तोंड देण्याकरतां हा अधिकार संघसरकारला दिला आहे. हा अधिकार देतांना एक खास खुलासा केलेला आहे आणि तो हितकर

आहे. युद्ध सुरू झालेलें नसतांना, तसेंच बंड किंवा अशांतता यांचा प्रत्यक्ष स्फोट व्हावयाच्यापूर्वी सुद्धां, आणीबाणीचा जाहीरनामा प्रसिद्ध करतां येईल, मात्र युद्ध किंवा बंड होण्याचा निकट संभव आहे अशी राष्ट्रपतीची ( म्हणजेच संघाच्या मंत्रिमंडळाची ) खात्री झाली पाहिजे. आणीबाणीचा जाहीरनामा पार्लमेंटाच्या दोनहि सभागृहांपुढें ठेवला पाहिजे. आणीबाणीचा जाहीरनामा केव्हांहि रद्द करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे आणि रद्द करणारा जाहीरनामा पार्लमेंटपुढें ठेवण्याचीहि आवश्यकता नाहीं. आणीबाणीचा जाहीरनामा दोन महिन्यांपर्यंत अंमलांत राहील. दोन महिन्यांच्या आंत त्या जाहीरनाम्याला पार्लमेंटाच्या दोनहि सभागृहांनीं संमति दिल्यास त्याची मुदत वाढेल.

कलम ३५२ खालीं काढलेला जाहीरनामा अमलांत असेतोंपर्यंत कोणत्याहि घटकाच्या सरकारला हुकूम करण्याचा अधिकार संघसरकारला राहील. तसेंच घटकांच्या कक्षेंतील बाबीसंबंधीं संघसरकारच्या अंमलदारांना अधिकार देणारे कायदे करण्याचा अधिकार पार्लमेंटास राहील. सरकारी उत्पन्नाची संघ व घटक यांचेमध्यें कशी वाटणी व्हावी यासंबंधी २६८ ते २७९ कलमामध्यें व्यवस्था ठरवून दिलेली आहे, तिच्यामध्यें फरक करण्याचा अधिकार आणीबाणीच्या कालापुरता राष्ट्रपतीच्या हातीं राहील.

कोणत्याहि घटकराज्यांत घटनेप्रमाणें राज्यकारभार चालू शकणार नाहीं अशी तक्रार गव्हर्नरकडून, किंवा राजप्रमुखाकडून अगर अन्यमार्गानें, राष्ट्रपतीकडे आली आणि ती तक्रार खरी आहे अशी राष्ट्रपतीची खात्री झाली तर राष्ट्रपतीस कलम ३५६ खालीं जाहीरनामा काढण्याचा अधिकार आहे. या कलमाखालीं जाहीरनामा काढून घटक राज्यांतील राज्यकारभार चालवण्याबाबतचे अधिकार राष्ट्रपति स्वतःकडे घेऊं शकेल, तसेंच घटक-राज्याच्या कायदेमंडळाचे कायदे करण्याचे अधिकार पार्लमेंटला देऊं शकेल, आणि घटनाकायद्यांतील घटकांच्या सत्तेसंबंधीं कलमें तात्पुरतीं निःसत्त्व करूं शकेल. याला अपवाद म्हणजे हायकोर्टाचे अधिकार राष्ट्रपति घेऊं शकणार नाहीं आणि हायकोर्टासंबंधीं घटनाकायद्यांतील कलमांना राष्ट्रपति हात लावूं शकणार नाहीं. कलम ३५६ खालीं काढलेला जाहीरनामा रद्द करणें किंवा बदलणें राष्ट्रपतीच्या अधिकारांत आहे. जाहीरनामा पार्लमेंटपुढें ठेवण्यांत

आला पाहिजे. जाहीरनामा अंमलांत असण्याची मुदत दोन महिन्यांची आहे. जर पार्लमेंटाच्या दोनहि सभागृहांनीं तो जाहीरनामा मंजूर केला तर त्याचा अंमल सहा महिनेपर्यंत चालू राहील. सहा महिन्यांनंतर पुनः पार्लमेंटानें त्याला मंजुरी दिली तर आणखी सहा महिने त्याचा अंमल चालू राहील. अशा प्रकारें जास्तींत जास्त तीन वर्षेपर्यंत आणीबाणीचा जाहीरनामा अंमलांत असूं शकेल.

कलम ३५६ प्रमाणें आणीबाणीचा जाहीरनामा काढून घटकाच्या कायदे-मंडळाचा कायदे करण्याचा अधिकार पार्लमेंटाकडे गेला असें राष्ट्रपतीनें जाहीर केलें असेल तर कायदे करण्याचा तो अधिकार पार्लमेंट राष्ट्रपतीस देऊं शकेल किंवा दुसऱ्या कोणालाहि तो अधिकार देण्याचा अधिकार राष्ट्रपतीस देऊं शकेल. हा अधिकार ज्याचेकडे देण्यांत आला असेल त्याला संघाच्या अंमलदारांना कांहीं कामें व अधिकार देतां येतील. तसेंच पार्लमेंटाच्या लोकसभेचें अधिवेशन चालू नसतांना घटकाचा कारभार चालविण्यासाठीं लागणारा पैसा घटकाच्या तिजोरींतून घेण्यास मंजुरी देण्याचा राष्ट्रपतीस अधिकार राहील. आणीबाणीच्या जाहीरनाम्याच्या मुदतींत पार्लमेंट जे कायदे करील ते जर घटकाच्या अधिकारक्षेत्राबाबतचे असतील तर त्यांचा अंमल आणीबाणीची परिस्थिति संपल्यावर जास्तींत जास्त बारा महिने चालू राहील.

कलम ३५८ मध्यें अशी व्यवस्था केली आहे कीं आणीबाणीच्या जाहीर-नाम्याच्या मुदतींत मूलभूत हक्कामुळें सरकारवर पडलेलीं नियंत्रणें नाहींशी होतील. आणि कलम ३५९ मध्यें असें फर्मावलें आहे कीं, मूलभूत हक्कांची अंमलबजावणी करण्यासाठीं कोर्टाकडे दाद मागण्याचा नागरिकाचा हक्क राष्ट्रपती स्थगित करूं शकेल. सुप्रीम कोर्ट किंवा हायकोर्ट यांचे अधिकार राष्ट्रपती आपलेकडे घेऊं शकणार नाहीं पण त्यांचें काम तात्पुरतें बंद पाडण्याचा अधिकार ३५९ व्या कलमानें राष्ट्रपतीस दिला आहे. अशा तऱ्हेचा अधिकार १९३५ च्या कायद्यानें दिलेला नव्हता.

## आर्थिक संकटकालीं

कलम ३६० आर्थिक दृष्टया आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाल्यास काय करावें हें सांगतें. जर अखिल भारताचें आर्थिक स्थैर्य, अगर अखिल

भारताची जगाच्या बाजारपेठेंतील पत, अगर भारतांतील कोणत्याहि भागाची पत किंवा आर्थिक स्थैर्य यांना धोका आहे असें राष्ट्रपतीस म्हणजेच संघराज्याच्या मंत्रिमंडळास वाटलें तर जाहीरनाम्याच्या द्वारा तसें प्रसिद्ध करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. या कलमाखालीं काढलेला जाहीरनामा पार्ल-मेंटाच्या दोनहि सभागृहापुढें ठेवला पाहिजे. जाहीरनाम्याचा अंमल दोन महिने चालू राहील. पार्लमेंटानें त्याला मंजुरी दिली तर त्यानंतरहि त्याचा अंमल चालू राहील. जाहीरनाम्याच्या मुदतींत कोणत्याहि घटक राज्याला अर्थविषयक हुकूम देण्याचा अधिकार संघराज्याला असेल. हुकमामध्यें आर्थिक कारभारासंबंधीं यमनियम असूं शकतील किंवा विशिष्ट कृति कोणची करावी हेंहि सांगतां येईल. घटक राज्यांतील सरकारी नोकरांच्या पगारांत व भत्यांत कपात करणें, संघाच्या नोकरांच्या पगारांत व भत्यांत कपात करणें, आणि मनीबिल म्हणजे आर्थिक बाबींसंबंधीं करावयाचे कायदे राष्ट्रपतीच्या मंजुरीसाठीं गव्हर्नरनें किंवा राजप्रमुखानें राखून ठेवलेच पाहिजेत असें फर्मावणें—या गोष्टी संघसरकारच्या अधिकारक्षेत्रांत येतात. या कलमान्वयें सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधिशांचा पगारसुद्धां कमी करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस ( म्हणजे संघाच्या मंत्रिमंडळास ) मिळतो. 'घटकांतील कायदे-मंडळांवर आणि मंत्र्यांवर अविश्वास, लोकांच्या स्वयंभू हक्कांवर आक्रमण आणि संघाच्या मंत्र्यांवर व पार्लमेंटावर अमर्याद विश्वास' हें या भागाचें सार आहे. टोटॅलिटेरिॲनिझम म्हणजे एका पक्षाची हुकूमशाही स्थापन करण्याची सनदच जणूं या भागांतील कलमांनीं दिली आहे. लोकांना कांहींहि करावयास वाव ठेवलेला नाहीं.

---

# भाग एकोणिसावा

# संकीर्ण

एकोणिसाव्या भागांत ३६१ ते ३६७ या कलमांचा समावेश आहे. इतर कोणच्याहि भागांत ज्या विषयांचा समावेश करतां आला नाहीं पण ज्या विषयांचा घटनेच्या कायद्यांत समावेश करणें इष्ट वाटलें त्यांचा समावेश या भागांत आहे. या भागाच्या मथळयाचें 'किरकोळ' असें सुद्धां भाषांतर कांहीं लेखकांनीं केलें आहे. या भागांत पुष्कळशा शब्दांच्या व्याख्या दिलेल्या आहेत. यांपैकीं जी शेवटची व्याख्या दिली आहे तिला एक अपवाद म्हणून जोडला आहे. या अपवादाच्या निमित्तानें पार्लमेंट आणि राष्ट्रपति यांना एक मोठा अधिकार दिला आहे. खरें म्हटलें म्हणजे तो अधिकार एका स्वतंत्र कलमानें द्यावयास पाहिजे होता आणि तें कलम पहिल्या किंवा पांचव्या किंवा अकराव्या भागांत घालावयास पाहिजे होतें. भारताच्या बाहेरचे सर्व देश हे परदेश आहेत अशी व्याख्या केली आहे. या व्याख्येचा रास्तपणा कोणीहि मान्य करील. पार्लमेंटनें केलेल्या कायद्यांतील यमनियम संभाळून कोणच्याहि परक्या देशाचा परकेपणा पूर्णपणें वा विशिष्ट बाबींपुरता नाहींसा करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस या अपवादाच्या मार्गानें दिला आहे. हा महत्त्वाचा अधिकार आहे आणि व्याख्येच्या अपवादामार्फत तो देणें हें अयोग्य आहे. हा अधिकार अशा प्रकारें कां दिलेला आहे याचा अजमास करणें शक्य आहे. ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें भारतानें रहावें किंवा नाहीं हा अत्यंत वादग्रस्त प्रश्न झालेला होता हें सर्वांनाच माहीत आहे. घटनेच्या कायद्यांतच त्याचा निकाल नमूद करावा असा कांहीं लोकांचा मानस होता. घटनाकायद्याचा जो खर्डा १९४८ च्या फेब्रुवारींत प्रसिद्ध झाला त्यासोबत जें पत्र मसुदासमितीनें जोडलें त्यांत या प्रश्नाचा खास उल्लेख केला होता. घटनाकायद्याच्या अगदीं शेवटल्या म्हणजे बाविसाव्या भागांतील शेवटच्या म्हणजे ३९५ व्या कलमानें याचें उत्तर कायद्याच्या दृष्टया नकारार्थी दिलें. पण घटनासमितीनें कांहीं शर्तींवर ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें हिंदुस्थाननें रहावें असें ठरवलें. या

निर्णयामुळें ब्रिटिश कॉमनवेल्थचे इतर घटकदेश हे अगदींच परके देश मानतां येईनात. ब्रिटनच्या पार्लमेंटानें खास कायदा करून भारताच्या नागरिकांना इंग्लंड स्कॉटलंडमध्यें मिळालेल्या कांहीं सवलती चालू ठेवल्या. तशीच कांहीं व्यवस्था भारत सरकारलाहि करतां यावी म्हणून हा अधिकार राष्ट्रपति व पार्लमेंट यांस दिलेला आहे. कोणाचें लक्ष सहज जाणार नाहीं अशा तऱ्हेनें तो घटनाकायद्यांत कां गुंफला गेला हें आतां वाचकांना समजेल.

या भागांत तीस पस्तीस व्याख्या दिल्या आहेत पण 'हिज मॅजेस्टी' या शब्दांची व्याख्या कोठेंच दिलेली नाहीं. 'हिज मॅजेस्टि' हे शब्द २९४, २९६, ३६३, ३७४ या कलमांमध्यें वापरलेले आहेत. 'जनरल क्लॉझेस ॲक्ट' या नांवाचा हिंदुस्थानसरकारनें केलेला एक कायदा आहे; त्यांत अनेक शब्दांच्या व्याख्या आहेत आणि तो कायदा घटनाकायद्याच्या ३६७ व्या कलमानें मान्य केला आहे. त्यांतहि 'हिज मॅजेस्टी' ची व्याख्या नाहीं. इंग्लंडचा राजा असा अर्थ ' हिज मॅजेस्टी ' या शब्दांतून निघूं शकत नाहीं. दुसऱ्या अनेक देशांचे राजे आहेत आणि त्या सर्वांना ' हिज मॅजेस्टि ' असेंच उपपद लावतात हें लक्षांत घेतां घटनाकायद्यांत ही महत्त्वाची उणीव आहे असें म्हणणें भाग आहे.

## खास संरक्षण

कलम ३६१ मध्यें राष्ट्रपति, गव्हर्नर व राजप्रमुख यांना जें खास संरक्षण घटनेच्या कायद्यानें दिलें आहे तें नमूद करण्यांत आलें आहे. हे प्रमुख अधिकारी आपलें कायदेशीर काम करीत असतांना त्यांच्या कृतींबद्दल कोण-चेंहि कोर्ट त्यांना जाब विचारूं शकणार नाहीं. याला अपवाद म्हणजे घटनेच्या ६१ व्या कलमान्वयें जें कोर्ट स्थापन होईल तें राष्ट्रपतीस जाब विचारूं शकेल. हें जें रक्षण दिलेलें आहे तें व्यक्तीपुरतें आहे. नागरिकाचा भारतसरकार किंवा घटकसरकार यांचेविरुद्ध फिर्याद करण्याचा हक्क ३६१ व्या कलमामुळें बाधित होत नाहीं. राष्ट्रपति, गव्हर्नर आणि राजप्रमुख यांचेविरुद्ध कोणतेंहि फौजदारी काम कोणच्याहि कोर्टांत त्यांच्या अधिकाराच्या मुदतींत चालणार नाहीं. राष्ट्रपति, गव्हर्नर आणि राजप्रमुख यांना पकडण्याचा हुकुम कोणतेंहि कोर्ट काढूं शकणार नाहीं. राष्ट्रपति किंवा गव्हर्नर किंवा राजप्रमुख

यांच्याशीं ज्यांचे खाजगी व्यवहार असतील त्यांना जर यांचेविरुद्ध दिवाणी कोर्टांत दाद मागावयाची असेल तर कमीत कमी दोन महिन्यांची नोटिस दिली पाहिजे आणि त्या दोन महिन्यांत जर वादीचें समाधान झालें नाहीं तर त्या मुदतीनंतर दिवाणी कोर्टांत दावा करतां येईल.

व्याख्या आणि हें ३६१ वें कलम सोडून देतां या भागांतील इतर कलमें अशीं आहेत कीं त्यांचा समावेश अन्य भागांत करतां आला असता आणि तसा करणें इष्ट होतें हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

कलम ३६२ हें पार्लमेंटाच्या व राज्यांच्या कायदेमंडळाच्या अधिकारावर एक विशिष्ट नियंत्रण घालणारें आहे. हें कलम बाराव्या भागांतील २९१ व्या कलमांत पोटकलम ३ म्हणून देणें योग्य झालें असतें. पूर्वीच्या देशी संस्थानांच्या राजांना खाजगी खर्चासाठीं कांहीं रकमा देण्याचा जर पूर्वीच्या हिंदी सरकारनें करार केला असेल आणि त्या रकमांवर कर लादला जाणार नाहीं असें कलम त्या करारांत असेल तर तो करार पार्लमेंट आणि घटकांचीं कायदेमंडळें यांनीं पाळला पाहिजे असें नियंत्रण या कलमांत घातलेलें आहे.

कलम ३६३ हें सुप्रीम कोर्टाच्या अधिकारावर नियंत्रण घालणारें आहे. कलमांत इतर कोर्टाचाहि उल्लेख आहे. पण इतर कोर्टाच्या अधिकाराचा प्रश्न घटनेच्या कायद्यांत घालण्याची आवश्यकता नसते. पार्लमेंट कायदे करून इतर कोर्टाचे अधिकार मर्यादित करूं शकतें. प्रश्न फक्त सुप्रीम कोर्टाच्या अधिकारावरील नियंत्रणाचा आहे. या दृष्टीनें पहातां या कलमाचा समावेश पांचव्या भागांत व्हावयास पाहिजे होता. कलम १३१ मध्यें या नियंत्रणाचा उल्लेख आलेला आहेच, तो ज्यास्त स्पष्ट करावयाचा उद्देश ३६३ कलमामध्यें दिसतो. कलम १३१ ला एक पोटकलम जोडून हा उद्देश सफल झाला असता आणि तसें करणें अधिक योग्य होतें. ता. २६ जानेवारी १९५० पूर्वी कोणच्याहि देशी संस्थानच्या राजाशीं हिंदसरकारनें कोणच्याहि प्रकारचा करार केला असेल—मग त्याचें नांव तह, करार किंवा सनद असो—आणि त्यांतून वाद निर्माण झाला असेल तर तो सुप्रीम कोर्टाकडे नेतां येणार नाहीं. याला एक अपवाद आहे तो असा कीं, त्या वादाच्या प्रकरणीं सुप्रीम कोर्टाचा केवळ सल्ला मागण्याचा राष्ट्रपतीचा हक्क कायम

राखण्यांत आला आहे. या विवेचनावरून हें सिद्ध होतें कीं, पांचव्या भागांत हें कलम घालणें इष्ट झालें असतें.

कलम ३६४ मध्यें मोटीं बंदरें आणि विमानतळ यासंबंधीं जे कायदे पार्लमेंट किंवा घटकांचीं कायदेमंडळें यांनीं केले असतील ते रद्द करण्याचा किंवा त्यांत फरक करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस दिलेला आहे. हें कलम अकराव्या भागांत घालावयास पाहिजे होतें.

कलम ३६५ मध्यें अशी अनुज्ञा आहे कीं या घटनाकायद्याला धरून संघ-सरकारनें जे हुकूम घटकांना पाठवले असतील ते जर एखाद्या घटकानें अमान्य केले किंवा योग्य रीतीनें पाळले नाहींत तर त्या घटकांत आणी-बाणीची परिस्थिति निर्माण झाली आहे असें जाहीर करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. हें कलम अठराव्या भागांत घालावयास पाहिजे होतें. कलम ३५६ मध्यें एक पोट कलम म्हणून हें कलम घालतां आलें असतें किंवा त्या कलमाच्या पहिल्या पोटकलमाला खुलासा ( Explanation म्हणून ) जोडतां आलें असतें.

# भाग विसावा

# घटनेची दुरुस्ती

विसाव्या भागांत एकच कलम ३६८ आहे, व त्यांत घटनेच्या कायद्यांत दुरुस्ती करावयाची असेल तर काय केलें पाहिजे हें सांगितलें आहे. ही घटना लोकांच्या नांवानें घटनासमितीनें केलेली आहे हें आतां सर्वांना माहीत झालेंच आहे. दुरुस्ती किंवा फरक किंवा वाढ करण्याचा अधिकार प्रत्यक्ष लोकांना द्यावयास कांहीं हरकत नव्हती. पण घटनेच्या कायद्यांत दुरुस्ती करण्याचा अधिकार पार्लमेंटासच दिलेला आहे. कांहीं भाग असा आहे कीं त्यांत फरक करावयाचा झाल्यास पार्लमेंटाच्या जोडीला निम्मेपेक्षां अधिक घटकांच्या कायदे-मंडळांची संमति मिळविली पाहिजे. पार्लमेंटानें करावयाच्या सामान्य कायद्यांत आणि घटनादुरुस्ती करणाऱ्या कायद्यांत फरक एवढाच कीं पार्लमेंटाच्या दरएक सभागृहांत दोन तृतीयांश बहुमताचा पाठिंबा घटनेच्या दुरुस्तीला मिळाला पाहिजे आणि शिवाय दरएक सभागृहाच्या सभासदांच्या एकंदर संख्येच्या निम्मेपेक्षां अधिक सभासदांची त्या दुरुस्तीला संमति मिळाली पाहिजे. एवढे संस्कार झाल्यावर राष्ट्रपतीची संमति एवढीच बाब शिल्लक रहाते आणि ती मंत्रिमंडळाच्या हातची असते.

ही योजना समाधानकारक नाहीं. जवळजवळ तीन वर्षांच्या भवति न भवतीनंतर मंजूर केलेल्या घटना कायद्यांत एक वर्षाच्या आंत दुरुस्त्या करावयास हल्लींचें तात्पुरतें पार्लमेंट सज्ज व्हावें याचा अर्थ काय ? घटना-दुरुस्तीशीं लोकांचा संबंध असता तर अशी घाई सत्ताधारी करूं शकले नसते. ज्या देशांत लोक जागृत असतात त्यांमध्यें सरकार घटनाकायद्याशीं खेळ खेळण्याचा असला प्रयत्न करूं शकत नाहीं. भारतांतील प्रजा ‘लोक’ या नांवाला कधीं लायक होईल कोण जाणे !

---

## भाग एकविसावा

# संक्रमणावस्थेंत

घटनाकायदा ता. २६ नोव्हेंबर १९४९ रोजीं पास झाला आणि नंतर दोनच महिन्यांनीं त्याची अंमलबजावणी करावयाचें ठरलें. आपल्या नव्या घटनेंत सांगितल्याप्रमाणें सर्व व्यवस्था करून नंतर ती अंमलांत आणावयाची असती तर कदाचित अठरा वीस महिनेपर्यंत भारतवर्ष डोमिनियन म्हणूनच राहिला असता. भारतवासीयांपैकीं प्रचंड बहुसंख्या तसें करावयास तयार नव्हती. त्यांना विनाविलंब आपला देश पूर्ण स्वतंत्र म्हणजे 'रिपब्लिक' व्हावयास पाहिजे होता. ता. २६ जानेवारी ही तारीख पवित्र भावनांशीं एकजीव झालेली होती व आहे. ता. २६ जानेवारी १९५० हा ब्रिटिश पार्लमेंटाच्या अधिकाराचा धागा तोडण्याचा दिवस ठरला. दोन महिन्यांत प्रौढ मतदारांच्या याद्या करून नव्या पार्लमेंटाच्या व नव्या कायदेमंडळांच्या निवडणुकी करणें अशक्य होतें. व वर्गातील घटकराज्यांत तर नवी घटना अंमलांत आणण्याला बेमुदत विलंब लागला असता. नवी स्वतंत्र राजवट सुरू तर करावयाची पण अराजक निर्माण होऊं द्यावयाचें नाहीं, या दोन गोष्टी साधण्याकरतां भाग एकवीसची योजना करावी लागली आहे. संधिकालाची ती योजना आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. या भागांत ३६९ ते ३९२ या कलमांचा समावेश आहे.

या भागांतील कलमांचा अनुक्रम अत्यंत सदोष आहे. या भागाची सुरुवात ३८० व्या कलमांतील मजकुरानें व्हावयास पाहिजे होती आणि त्यानंतर ३८१ व ३७९ या कलमांतील मजकूर यावयास पाहिजे होता. ३६९ हें तर या भागांत घालावयास नको होतें; त्याला योग्य जागा अकराव्या भागांत मिळण्याजोगी होती. कलमें ३७० व ३७१ यांचें योग्य स्थान या भागाच्या अखेरीस होतें; पण या दोन कलमांना अग्रस्थान मिळालें आहे. या भागांतील कलमांचा अनुक्रम ठरवितांना तर्क किंवा कला यांपैकीं कशाकडेहि लक्ष दिलेलें नाहीं.

## राष्ट्रपतीची प्रतिष्ठापना

नव्या घटनेचा अमल व्हावयाचा म्हणजे राष्ट्रपतीची निवडणूक व नेमणूक झाली पाहिजे. घटनाकायद्याप्रमाणें नवें पार्लमेंट व नवीं कायदेमंडळें निवडलीं गेल्यानंतर राष्ट्रपतीची नेमणूक होऊं शकणार आणि तें तर अशक्य, म्हणून या भागांत कलम ३८० द्वारा अशी अनुज्ञा केलेली आहे कीं घटना-परिषदेनें ज्या व्यक्तीची राष्ट्रपति म्हणून निवड केली असेल त्याचीच पहिले राष्ट्रपति म्हणून प्रतिष्ठापना व्हावी. याप्रमाणें डॉ. बाबू राजेन्द्रप्रसाद यांची निवड झाली आणि ता. २६ जानेवारी १९५० रोजीं सकाळीं त्यांची प्रतिष्ठा-पनाहि झाली.

राष्ट्रपतीस मंत्रिमंडळ पाहिजे म्हणून कलम ३८१ मध्यें अशी योजना केली आहे कीं, राष्ट्रपतीनें नेमलेल्या व्यक्तीचें पहिलें संघराज्याचें मंत्रिमंडळ बनेल, आणि राष्ट्रपतीकडून नेमणुका होईपर्यंत कांहीं काल गेला तर ही घटना अंमलांत यावयाच्यापूर्वी जे गव्हर्नरजनरलचे मंत्रि होते त्यांचेंच मंत्रिमंडळ बनेल.

मंत्रिमंडळाला पार्लमेंट पाहिजे कारण पार्लमेंटाशिवाय जमाखर्च मंजूर करण्याचा अधिकार कोणालाहि नाहीं. नव्या घटनेप्रमाणें निवडणुकी होईपर्यंत जुन्या घटनासमितीचेंच पहिल्या तात्पुरत्या पार्लमेंटांत रूपांतर व्हावें असें कलम ३७९ मध्यें सांगितलें आहे. फरक केला तो असा कीं जे घटनापरिषदेचे सभासद प्रांतांतील कायदेमंडळाचे सभासद होते त्यांच्या जागीं प्रांतांतील कायदेमंडळांचे सभासद नसलेल्या स्त्रीपुरुषांची निवड करण्याची अनुज्ञा दिली. निवडण्याचा हक्क पूर्वीप्रमाणेंच प्रांतांच्या असेंब्लीच्या सभासदांपुरता मर्यादित ठेवण्यांत आला. जातवार प्रतिनिधित्व काढून टाकण्यांत आलें हें फारच छान झालें, पण प्रमाणशीर प्रतिनिधित्व काढून टाकलें हें अत्यंत गर्हणीय झालें.

## इतर वरिष्ठ अधिकारी

१९३५ च्या कायद्याखालीं जे फेडरल कोर्टाचे न्यायाधीश होते त्यांचेंच सुप्रीम कोर्ट बनावें असें कलम ३७४ मध्यें फर्मावलें आहे. मात्र त्यांपैकीं कोणी जर स्वखुषीनें निघून जाईल तर त्याला जाऊं द्यावें.

१९३५ च्या राजवटींत जो ऑडिटरजनरल होता तो नव्या घटनेखालींहि ऑडिटरजनरल असावा असें कलम ३७७ मध्यें सांगितलेलें आहे. पब्लिक सर्व्हिस कमिशनचे जे सभासद १९३५ च्या कायद्याखालीं नेमलेले होते तेच नव्या कायद्याखालीं नेमले आहेत असें समजण्यांत येईल आणि त्यांना आपलें पूर्वीचेंच काम करण्याचा अधिकार राहील.

अ वर्गातील संस्थानांत जे कोणी १९३५ च्या कायद्याप्रमाणें गव्हर्नर म्हणून नेमलेले होते तेच ता. २६ जानेवारी १९५० रोजीं नव्या घटना कायद्याखालीं गव्हर्नर होतील. गव्हर्नरांच्या नेमणुका राष्ट्रपतींच्या हातांत असल्यामुळें दुसऱ्या व्यक्तींच्या नेमणुका होऊं शकतील. निवडणुकीचा गव्हर्नरांच्या नेमणुकीशीं कांहींहि संबंध नाहीं हें वाचकांना माहित आहेच. ब वर्गातील संस्थानांत राजप्रमुख असल्यामुळें त्यांचेसाठीं निराळी व्यवस्था करण्याचा प्रश्न उद्भवत नाहीं.

घटक राज्यांतील मंत्र्यांच्या नेमणुका गव्हर्नर व राजप्रमुख करणार. पण नव्या राजवटींत तशा नेमणुका होईपर्यंत जुनेच मंत्री अधिकारारूढ व्हावयाचे अशी व्यवस्था कलम ३८४ व ३८६ मध्यें केलेली आहे.

कलम ३८२ मध्यें असें सांगितलें आहे कीं नव्या घटनेखालीं कायदेमंडळांच्या सभासदांच्या निवडणुकी होईपर्यंत १९३५ च्या कायद्यान्वयें जीं कायदेमंडळें कायदे करीत होतीं तींच नव्या घटनेखालीं घटकराज्यांसाठीं कायदे करण्याचा व बजेट मंजूर करण्याचा अधिकार उपभोगतील. ही व्यवस्था अ वर्गातील संस्थानांसंबंधींची आहे. ब वर्गातील संस्थानासंबंधींची व्यवस्था कलम ३८५ मध्यें सांगितलेली आहे. ब वर्गातील संस्थानांत रीतसर कायदेमंडळें होतींच असें नाहीं. शिवाय ब वर्गातील कांहीं घटक म्हणजे पूर्वीच्या अनेक संस्थानांचे बनलेले संघ असल्यामुळें रीतसर निवडलेलीं कायदेमंडळें असणें शक्यहि नव्हतें. कांहीं ठिकाणीं तर राजे लोकांच्या हातांत सर्व अधिकार होता. म्हणून अशी व्यवस्था केली आहे कीं, ज्या समितीकडे किंवा व्यक्तीकडे कायदे करण्याचा अधिकार ता. २५ जानेवारी १९५० रोजीं होता तिच्याचकडे तो नव्या घटनाकायद्यास अनुसरून नवीं कायदेमंडळें स्थापन होईपर्यंत चालू राहील.

कलम ३७६ मध्यें हायकोर्टाबद्दलची व्यवस्था आहे. नवी घटना अंमलांत यावयाच्या पूर्वी जे इसम हायकोर्टाचे न्यायाधीश होते तेच ता. २६ जानेवारी १९५० रोजीं नव्या घटनेखालीं हायकोर्टाचे न्यायाधीश होतील. मात्र कोणच्याहि न्यायाधिशास राजीनामा देण्याची मुभा आहे. ब वर्गातील संस्थानांसाठीं असें फर्माविलेलें आहे कीं जुन्या न्यायाधिशांनीं ता. २६ जानेवारीनंतर किती दिवस अधिकारावर रहावें हें ठरवण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. म्हैसुरच्या हायकोर्टाच्या एका न्यायाधिशाची मुदत राष्ट्रपतींनीं संपविली हें वाचकांना आठवत असेलच.

सर्व फौजदारी, दिवाणी आणि मुलकी कोर्टें आपापलें काम नव्या घटना-कायद्याखालीं चालवूं शकतील अशी व्यवस्था ३७५ कलमान्वयें केलेली आहे.

कलम ३९० मध्यें सरकारी जमाखर्चासंबंधीं ता. २६ जानेवारी ते ३१ मार्च १९५० या मुदतीपुरती खास व्यवस्था केली आहे. नव्या घटनाकायद्यांतील सर्व यमनियम पाळून १ एप्रिल १९५० पासूनचें बजेट तयार होणार. पण तोंपर्यंत काय? म्हणून असें जाहीर केलें आहे कीं पूर्वीच्या नियमांस धरून केलेल्या बजेटप्रमाणें या सरासरी दोन महिन्यांच्या मुदतींत केलेला खर्च हा रीतसर केलेला खर्च आहे असें समजावें.

कलम ३८७ मध्यें अशी आज्ञा आहे कीं नवी घटना अमलांत आल्यापासून तीन वर्षेपर्यंत सबंध भारत देशाची किंवा कोणच्याहि घटकाची लोकसंख्या मोजण्याची पद्धत काय असावी हें राष्ट्रपति ठरवील. या बाबतींत निरनिराळ्या घटकांसाठीं निरनिराळ्या पद्धती मंजूर करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे.

## अराजक माजूं नये म्हणून

ब्रिटिश राजवटीचा अंत झाला तरी पूर्वी केलेले कायदे जर रद्द झाले तर भयंकर अराजक माजेल म्हणून कलम ३७२ मध्यें असें फर्माविलें आहे कीं, ता. २६ जानेवारी १९५० पूर्वी जे कायदे अंमलांत होते ते सर्व नंतरहि चालू रहातील. मात्र त्यांत फरक करण्याचा अधिकार पार्लमेंटास किंवा घटकाच्या कायदेमंडळास नव्या घटनेंतील नियमांस अनुसरून राहील. कांहीं बारीक सारीक दुरुस्त्या संक्रमणापायीं कराव्या लागतील तर त्या करण्याचा अधिकार दोन वर्षेपर्यंत राष्ट्रपतीस आहे. पण या दोन वर्षात पार्लमेंटाचा किंवा

कायदेमंडळाचा अधिकार स्थगित होतो असें नव्हे. आणि पार्लमेंटानें किंवा कायदेमंडळानें ता. २६ जानेवारी १९५० नंतर केलेल्या कायद्यांत हस्तपेक्ष करण्याचा अधिकार या कलमामुळें राष्ट्रपतीस मिळतो असेंहि नाहीं.

नव्या घटनेच्या बाविसाव्या कलमांत तीन महिन्यांपेक्षां जास्त मुदतीपर्यंत कोणालाहि विनाचौकशी अटकेंत ठेवण्यासंबंधीं कायदा करण्याचा अधिकार पार्लमेंटास दिलेला आहे. नव्या घटनेला अनुसरून जरूर तो कायदा पार्लमेंट-कडून पास होईपर्यंत तसला कायदा करण्याचा तात्पुरता अधिकार कलम ३७३ नें राष्ट्रपतीस दिला आहे. या तात्पुरत्या अधिकाराची कमाल मुदत ता. २६ जानेवारी १९५१ पर्यंतच आहे.

ता. २६ नोव्हेंबर १९४९ नंतर पण ता. २६ जानेवारी १९५० च्या आधीं जर १९३५ च्या कायद्याखालीं असे कांहीं हुकूम काढण्यांत आले असतील कीं, त्यांच्यापायीं नव्या घटनेच्या पहिल्या व चौथ्या परिशिष्टांत फरक करणें भाग आहे तर ते फरक करण्याचा अधिकार कलम ३९१ नें राष्ट्रपतीस दिला आहे. हे फरक करतांना जरूर ती आनुषंगिक व्यवस्था करण्याचाहि अधिकार राष्ट्रपतीस आहे.

ज्यांना पूर्वी प्रांत म्हणत असत त्यांच्याइतकी देशी संस्थानांची प्रगति झालेली नव्हती म्हणून नवी घटना अंमलांत आणल्यानंतर कांहीं कालपर्यंत संघाचे प्रांतांशीं जसे संबंध असतील त्यापेक्षां देशी संस्थानाशीं कांही अंशीं भिन्न असे संबंध असणें इष्ट होऊं शकेल म्हणून कलम ३७१ द्वारा अशी व्यवस्था केली आहे कीं, दहा वर्षेपर्यंत जुन्या देशी संस्थानांचा म्हणजे नव्या घटनेंतील ब वर्गाच्या घटकांचा राज्यकारभार राष्ट्रपतीच्या हुकमतीखाली चालावा. ही दहा वर्षांची मुदत कमी करण्याचा किंवा वाढविण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे. तसेंच एकाद्या संस्थानला या हुकमतीपासून मुक्त करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे.

काश्मीर संस्थान ज्यावेळीं हिंदुस्थानशीं संलग्न झालें त्यावेळीं त्याचा दर्जा इतर संस्थानांपेक्षां निराळा ठेवलेला होता. इतर संस्थानांनीं जुन्या प्रांताइतक्या प्रमाणांत संघाचा अधिकार मान्य केला. काश्मीरनें संरक्षण व परराष्ट्रसंबंध आणि तत्सम व आनुषंगिक बाबींपुरतांच संघाचा अधिकार

मान्य केला. त्यामुळें घटनाकायद्याचें २३८ वें कलम काश्मीर संस्थानला लागू नाहीं आणि पार्लमेंटचा काश्मीर संस्थानसाठीं कायदे करण्याचा अधिकार सामीलनाम्यानें मर्यादित केलेला आहे अशी व्यवस्था कलम ३७० मध्यें केलेली आहे. काश्मीर ज्यावेळीं हिंदुस्थानांत सामील झाला त्यावेळीं अशी घोषणा करण्यांत आली होती कीं काश्मीरमध्यें सार्वमत घेण्यांत येईल आणि त्या सार्वमताच्या निकालावर काश्मीरसंबंधीं कायम व्यवस्था अवलंबून राहील. जर सार्वमताचा निकाल हिंदुस्थानविरुद्ध गेला तर भारताच्या घटनाकायद्याची दुरुस्ती केल्याशिवाय काश्मीर भारतापासून अलग करतां यावा म्हणून विशिष्ट अधिकार याच कलमाच्या तिसऱ्या पोटकलमानें राष्ट्रपतीस दिलेला आहे. मात्र काश्मीरच्या घटनासमितीच्या संमतीशिवाय हा अधिकार राष्ट्रपति वापरूं शकणार नाहीं.

पांच वर्षेपर्यंत म्हणजे ता. २६ जानेवारी १९५५ पर्यंत कापूस, लोंकर, कपडा, सरकी, कागद, अन्न, तेल, गळिताचीं धान्यें, गुरांचें अन्न, पेंड, दगडी कोळसा, लोखंड, पोलाद आणि अभ्रक—या बाबींसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार संघाच्या पार्लमेंटास कलम ३६९ नें दिला आहे.

या भागाच्या शेवटच्या म्हणजे ३९२ व्या कलमांत राष्ट्रपतीस घटनेच्या कायद्याच्या अम्मलबजावणीबाबत अल्पकालासाठीं फार मोठा अधिकार दिलेला आहे. नव्या निवडणुकी होऊन पार्लमेंटचें पहिलें अधिवेशन भरलें म्हणजे हा अधिकार नष्ट होईल. ता. २६ नोव्हेंबर १९४९ पासून ता. २६ जानेवारी १९५० पर्यंत हा अधिकार गव्हर्नरजनरलच्या हातीं होता. १९३५ च्या कायद्याच्या राजवटीवरून नव्या घटनेप्रमाणें निर्माण होणाऱ्या राजवटींत भारत देश जात असतांना ज्या तांत्रिक अडचणी निर्माण होतील त्यांचें निराकरण करण्यासाठीं हा अधिकार राष्ट्रपतीच्या हातीं दिला आहे. अल्पावधीपर्यंत नव्या घटनाकायद्यांतील व्यवस्थेंत फेरफार करण्याचा हा अधिकार आहे. या अधिकाराचा उपयोग करून काढलेला प्रत्येक हुकूम राष्ट्रपतीनें पार्लमेंटापुढें ठेवला पाहिजे. या अधिकाराचा उपयोग फारच जबाबदारीचा व गंभीर आहे हें सहज समजण्याजोगें आहे.

---

## भाग बाविसावा

# घटनेची अंमलबजावणी

घटनाकायद्याच्या वीस भागांत म्हणजे कलमें १ ते ३६८ यांमध्यें भारताची नवी घटना सामावलेली आहे. शिवाय शेवटचीं तीन कलमें म्हणजे ३९३, ३९४ व ३९५ यांमध्यें कांहीं अवश्य अशा आनुषंगिक गोष्टींचा उल्लेख व खुलासा आहे. कलम ३९३ मध्यें घटनाकायद्याचें नांव सांगितलेलें आहे. तें नांव सर्वांनीं जरूर लक्षांत ठेवावें. ' कॉन्स्टिटयूशन ऑफ इंडिया ' असें या कायद्याचें नांव आहे, ' कॉन्स्टिटयूशन अॅक्ट ' असें नांव नाहीं. कांही ज्ञानवंत आणि अधिकाराच्या जागांवर बसलेल्या व्यक्तींनीं 'अॅक्ट' या नांवानें आपल्या नव्या म्हणजे स्वतंत्र घटनेचा उल्लेख केलेला आहे म्हणून हें खास स्पष्टीकरण करावें लागलें आहे. ब्रिटिश पार्लमेंटानें हिंदुस्थानसाठीं केलेले कायदे हे ' कॉन्स्टिटयूशन अॅक्ट ' या नांवानें ओळखले जात होते. त्या नांवाची पकड अजून असल्या व्यक्तींना सोडीत नाहीं हें दुर्दैव आहे.

कलम ३९४ मध्यें घटनाकायद्याचीं कोणचीं कलमें तावडतोब अंमलांत यावयाचीं आणि कोणचीं कलमें ता. २६ जानेवारी १९५० रोजीं अंमलांत यावयाचीं याचा उल्लेख आहे. कलम ३९५ मध्यें ब्रिटिश पार्लमेंटाचा हिंदुस्थानवरचा अधिकार साफ नष्ट झाला असें अप्रत्यक्ष रीतीनें पण निःसंदिग्धपणें जाहीर केलें आहे. हें म्हणजे ३९५ वें कलम ता. २६ जानेवारी १९५० रोजीं अंमलांत यावयाचें होतें आणि त्याप्रमाणें तें अंमलांत आलेंहि.

---

# आदिवासी व वन्य लोक

## ( परिशिष्टें पांच व सहा )

हरिजन व आदिवासी यांचे हितसंबंध विशेष कृतीनें रक्षण केले पाहिजेत अशी ग्वाही कलम ४६ मध्यें दिलेली आहे आणि त्यांचेसाठीं सोळाव्या भागांत कांहीं बाबींसंबंधीं विस्तृत व्यवस्था दिली आहे. पण तेवढ्यानें भागणार नाही असें वाटल्यामुळें आणखी कांहीं व्यवस्था परिशिष्ट पांच व सहा यांमध्यें ग्रथित केलेली आहे. ही व्यवस्था २४४ व्या कलमामुळें घटनेचा प्रत्यक्ष एक भाग होऊन बसली आहे. या दोन परिशिष्टांमध्यें हरिजनांचा विषय नाहीं. तसेंच ज्या बाबी घटनेच्या सोळाव्या भागांत आल्या आहेत त्यांचाहि परामर्श या परिशिष्टांमध्यें घेतलेला नाहीं. यांत आदिवासींची वस्ती ज्या भागांत आहे त्या भागांच्या कारभारासंबंधीं व्यवस्था आहे. पांचव्या परिशिष्टांत आसामशिवाय (प्रदेशांतील) घटकराज्यांतील आदिवासींच्या भागाबद्दल व्यवस्था आहे. आणि सहाव्या परिशिष्टांत आसाममधील आदिवासींच्या भागांबद्दल व्यवस्था आहे. आसामप्रांत सीमेवरील असून तेथें वन्य म्हटल्या जाणाऱ्या अनेक जाती आहेत. इतकेंच नव्हे तर कांहीं भाग असे आहेत कीं तेथें इतर भागासारखा राज्यकारभार चालत नसे; ते भाग पुष्कळशा प्रमाणांत स्वायत्त असत. कांहीं भागांतील लोकांना हिंदु असें सुद्धां म्हणत नसत तर 'अनीमिस्ट' ही संज्ञा देण्यांत येत असे. १९३५ च्या कायद्यांत प्रांतिक असेंब्लीच्या १०८ जागांपैकी ९ जागा या लोकांकरतां राखून ठेवलेल्या होत्या आणि त्या जागांसाठीं त्या लोकांपैकींच उमेदवार उभे रहातील अशी व्यवस्था केलेली होती. आपल्या नव्या घटनेप्रमाणें त्या लोकांकरितां लोकसभेंत जागा तर राखून ठेवलेल्या आहेतच. शिवाय त्यांच्या प्रदेशासाठीं राज्यकारभाराची सुद्धां खास तरतूद करून ठेवली आहे.

## पांचवें परिशिष्ट

तारतम्यानें पहातां पांचवें परिशिष्ट फारच लहान आहे इतकेंच नव्हे तर या दोन परिशिष्टांतील व्यवस्थेंत महत्त्वाचा फरक आहे. पांचवें परिशिष्ट

आसामखेरीज इतर प्रदेशांना लागू आहे. या प्रदेशांत म्हणजेच घटक राज्यांत ज्या आदिवासी जमाती असतील किंवा आदिवासींच्या वस्तीचे भाग असतील त्यांचेवर प्रादेशिक म्हणजेच घटकराज्याच्या सरकारचा अधिकार आहे. आसाममध्यें निराळी परिस्थिति आहे.

ज्या घटकराज्यांत आदिवासी समाज आहे तेथें राष्ट्रपतीनीं हुकूम दिल्यास एक सल्लागारमंडळ नेमलें पाहिजे. जर आदिवासी वस्तीचे अलग भाग असतील तर राष्ट्रपतींच्या हुकमाचा प्रश्न उद्भवत नाहीं, त्यांचेकरतां सल्लागारमंडळ नेमलेंच पाहिजे. असे अलग भाग कोणचे हें ठरवण्याचा अधिकार राष्ट्रपतींना आहे. सल्लगारमंडळाच्या सभासदांची संख्या विसांपेक्षां अधिक असतां कामा नये आणि त्यांतील तीनचतुर्थांश सभासद लोकसभेंतील आदिवासींचे प्रतिनिधि असले पाहिजेत. जर पुरेसे प्रतिनिधि लोकसभेंत नसतील तर जरूर तितके अन्य सभासद निवडून देतां येतील. मात्र सर्व सभासद आदिवासी समाजा-मधीलच असले पाहिजेत. गव्हर्नर किंवा राजप्रमुख ज्या बाबींसंबंधीं सल्ला विचारील त्याचा विचार करून योग्य सल्ला देणें हें या सल्लागारमंडळाचें काम आहे. अर्थात आदिवासींच्या हितासंबंधीचेच प्रश्न सल्लागारमंडळापुढें येणार.

सल्लागारमंडळाच्या सभासदांची संख्या, कोणाला सभासद नेमावें, मंडळाचा अध्यक्ष कोणाला नेमावें, मंडळाचे अंमलदार व इतर नोकर कसे नेमावे—या गोष्टी गव्हर्नर किंवा राजप्रमुख यानें नियमांच्या द्वारा ठरवाव्या. तसेंच सभेचें व मंडळाचें इतर काम कसें चालावें हेंहि गव्हर्नर वा राजप्रमुख यानें ठरवावें. इतर आनुषंगिक बाबींसंबंधीं नियम करण्याचा अधिकारहि गव्हर्नर वा राजप्रमुख यासच आहे.

पार्लमेंटनें किंवा घटकराज्याच्या कायदेमंडळानें केलेला कोणचाहि कायदा या भागापुरता रद्द करण्याचा अधिकार गव्हर्नर वा राजप्रमुखास आहे. कायदा अजिबात रद्द केला पाहिजे असा निर्बंध नाहीं, त्यांत फरक करून तो कायदा लागू करण्याचाहि अधिकार गव्हर्नर वा राजप्रमुखास आहे.

या अलग भागांत शांतता आणि चांगली राज्यव्यस्था राखण्याकरितां गव्हर्नर वा राजप्रमुख कायदे करूं शकतो. इंग्रजीमध्यें या कायद्यांना 'रेग्यु-लेशन' हें नांव देण्यांत आलें आहे. त्याच्या जागीं मराठींत कोणता शब्द वाप-

रावयाचा हें सरकारी रीत्या अजून ठरलेलें नसल्यामुळें तोच शब्द वापरणें सोईचें आहे. जमिनीची देवघेव, जमिनीचें वांटप आणि सावकारी, या बाबीं-करितां कायदे करण्याची ही खास तरतूद केलेली आहे. रेग्युलेशन करतांना पार्लमेंटाचा किंवा घटक राज्याच्या कायदेमंडळाचा कोणचाहि कायदा रद्द करण्याचा किंवा त्यांत फरक करण्याचा अधिकार गव्हर्नरास किंवा राजप्रमुखास आहे. मात्र कोणचाहि रेग्युलेशन करण्यापूर्वी सल्लागारमंडळाचा सल्ला घेतला पाहिजे आणि राष्ट्रपतीकडे रेग्युलेशन मंजुरीसाठीं पाठविला पाहिजे. राष्ट्रपतीची मंजुरी मिळाल्यानंतरच तो अंमलांत आणतां येतो.

आदिवासींचे अलग भाग एकदां राष्ट्रपतींनीं ठरवले म्हणजे ते वाढवण्याचा अधिकार त्यांना नाहीं; उलट ते कमी करण्याचा अधिकार राष्ट्रपतीस आहे. एकादे ठिकाणीं चतुःसीमा दुरुस्त कराव्या लागल्या तर जरूर ती दुरुस्ती राष्ट्रपति करूं शकेल. जर एकाद्या घटकराज्याच्या चतुःसीमा बदलल्या किंवा एकादें नवें घटकराज्य बनवण्यांत आलें तर कांहीं भाग आदिवासींचा भाग म्हणून जाहीर करतां येईल.

या भागांतील राज्यकारभारासंबंधीं वार्षिक अहवाल गव्हर्नरनें अगर राजप्रमुखानें राष्ट्रपतीकडे पाठवला पाहिजे. याशिवाय राष्ट्रपतीनें मागणी केल्यास केव्हांहि अहवाल सादर करण्याची जबाबदारी गव्हर्नर किंवा राज-प्रमुख याचेवर पडते. या भागांचा राज्यकारभार कसा चालावा याबाबत अनुज्ञा देण्याचा अधिकार संघसरकारला आहे.

पांचव्या परिशिष्टांतील अखेरच्या परिच्छेदांत असें सांगितलें आहे कीं पार्लमेंट कायदा करून या परिशिष्टांत फरक करूं शकेल. असा फरक करणें म्हणजे घटनेची दुरुस्ती करणें असें समजण्यांत येणार नाहीं.

## सहावें परिशिष्ट

सहावें परिशिष्ट मोठें आहे. घटनाकायद्याचीं पंधरा पृष्ठें या परिशिष्टानें व्यापलीं आहेत. घटकराज्याच्या सरकारचा अधिकार आसामखेरीज इतर प्रदेशांतील आदिवासी वस्तीच्या भागावर चालेल असें पांचव्या परिशिष्टांत सांगितलें आहे. आसाममध्यें या भागांच्या पोटविभागांना स्वायत्तता दिलेली

आहे, इतकेंच नव्हे तर या स्वायत्त भागांत जीं कौन्सिलें स्थापन करावयाचीं आहेत त्यांना विशिष्ट बाबींसंबंधींचे कायदे करण्याचा अधिकार दिलेला आहे. इंग्रजी भाषेंत कायदेकानूंना निरनिराळे शब्द आहेत त्या शब्दांवरून दर्जाचें तारतम्य ओळखतां येतें. त्या शब्दांमध्यें 'लॉ' हा शब्द वरिष्ठ दर्जा दाखवणारा आहे. सहाव्या परिशिष्टांतील तिसऱ्या परिच्छेदानें (लॉज) कायदे करण्याचा अधिकार या कौन्सिलांना दिला आहे. स्वायत्त (ऑटॉनॉमस) आणि कायदे (लॉज) या दोन शब्दांचा उपयोग करून जवळ जवळ घटकराज्यांचा दर्जा आसामांतील आदिवासी वस्तीच्या निरनिराळया भागांना दिला आहे असें म्हणतां येईल. ज्या बाबींसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार दिलेला आहे त्यांत केवळ मामुली बाबी नसून (१) विवाह (२) वारसा हक्क (३) पोलिस (४) सामाजिक रूढी, यांसारख्या महत्त्वाच्या बाबी समाविष्ट केलेल्या आहेत. कायद्याचीं कोर्टे स्थापन करण्याचा अधिकार फार वरच्या दर्जाचा अधिकार समजतात. सन १९२० पर्यंत प्रांतिक कायदेमंडळांना सुद्धां हा अधिकार नव्हता. असा हा मोठा अधिकार आसामांतील स्वायत्त भागांतील कौन्सिलांना दिलेला आहे. असें असतां हा सगळा घटनाकायद्याचा भाग परिशिष्टाच्या स्वरूपांत कां दिला हें समजणें जरा कठीण आहे.

आसाममधील वन्य किंवा आदिवासी प्रदेशांचे दोन भाग करण्यांत आले आहेत आणि या प्रदेशांच्या दोन याद्या विसाव्या परिच्छेदाला जोडण्यांत आल्या आहेत. 'अ' विभागांत (१) संयुक्त खासी जैतिया पहाडी जिल्हा (२) गारोपहाडी जिल्हा (३) लुशाई पहाडी (४) नाग पहाडी जिल्हा (५) उत्तर काचा पहाड आणि (६) मिकिर पहाड, यांचा समावेश आहे. 'ब' विभागांत (१) ईशान्य सरहद्द प्रदेश आणि (२) नागप्रदेश, यांचा समावेश आहे. ईशान्य सरहद्द प्रदेशांत बालिपारा, तिरप, आंबोरटेकडी आणि मिसिमिटेकडी यांचा समावेश आहे. अ आणि ब विभागांमध्यें फरक असा आहे कीं परिशिष्टांतील एक ते सतरा परिच्छेदांत दिलेले नियम अ विभागाला सरळ लागू होतात. ब विभागाला ते लागू करण्याचा अधिकार गव्हर्नरला देण्यांत आला आहे, मात्र हा अधिकार वापरतांना राष्ट्रपतीची संमति गव्हर्नरनें घेतली पाहिजे.

अ विभागांतील सहाहि पोटविभाग हे स्वायत्त जिल्हे बनवलेले आहेत. याशिवाय अशी व्यवस्था आहे कीं या जिल्ह्यांत जर निरनिराळ्या आदिवासी जातीची वस्ती असेल तर दरएक जातीनिहाय स्वायत्त प्रदेश बनविण्याचा अधिकार गव्हर्नरला देण्यांत आला आहे.

## जिल्हा कौन्सिल

दरएक स्वायत्त जिल्ह्याचें एक कौन्सिल असलें पाहिजे. या कौन्सिलमध्यें ज्यास्तींत जास्त चौवीस सभासद असूं शकतील. यांपैकीं तीन चतुर्थांश सभासद वयांत आलेल्या स्त्री-पुरुष नागरिकांनीं निवडलेले असले पाहिजेत. दरएक स्वायत्त प्रदेशासाठीं एक प्रादेशिक कौन्सिल असलें पाहिजे. या कौन्सिलांना घटक राज्याच्या सरकारसारखा कायदेशीर दर्जा देण्यांत आला आहे.

हीं कौन्सिलें प्रथम कशी बनवावीं यासंबंधीं नियम करण्याचा अधिकार गव्हर्नरास आहे. कौन्सिलचे एकंदर सभासद किती असावे आणि त्यांतील जागांची वाटणी कशी करावी, सभासद निवडण्यासाठीं प्रादेशिक विभाग कसे पाडावे, मतदानाचा हक्क कोणाला असावा, मतदारांच्या याद्या कशा तयार कराव्या, उमेदवारांची लायकी काय असावी, सभासदांची कमाल मुदत किती असावी, कौंसिलचें काम कसें चालावें, कौंसिलचे अंमलदार व इतर नोकर यांच्या नेमणुका कशा कराव्या, या सर्व बाबींसंबंधीं गव्हर्नरनें नियम करवयाचे आहेत. पहिलीं कौंसिलें अस्तित्वांत आल्यानंतर या सर्व बाबींसंबंधीं नियम करण्याचा अधिकार प्रत्येक कौंसिलला प्राप्त होईल. या बाबींशिवाय दुय्यम स्थानिक कौंसिलें किंवा बोर्ड स्थापण्यासंबंधीं व जिल्ह्याचा अगर प्रदेशाचा राज्यकारभार कसा चालावा यासंबंधीं नियम करण्याचा अधिकारहि हरएक कौन्सिलला प्राप्त होईल. सहा जिल्ह्यांपैकीं उत्तर काचार पहाड आणि मिकिर पहाड यांपुरती अशी व्यवस्था आहे कीं त्या भागाचा डेप्युटी कमिशनर किंवा प्रांतऑफिसर कौंसिलचा पदसिद्ध अध्यक्ष होईल आणि सहा वर्षेपर्यंत कौंसिलचे ठराव बदलूं शकेल किंवा रद्दहि करूं शकेल; इतकेंच नव्हे तर कौंसिलला तो हुकूम सुद्धां करूं शकेल आणि त्यानें केलेले हुकूम कौंसिलनें मानलेच पाहिजेत. डेप्युटी कमिशनर किंवा प्रांत-ऑफिसर गव्हर्नरच्या हुकमतीखालीं हा अधिकार वापरील.

दर एक कौन्सिलला खालील बाबींसंबंधीं कायदे ( लॉज ) करण्याचा अधिकार आहे:—

( १ ) शेतीसाठीं, गुरचराईसाठीं किंवा घरें बांधण्यासाठीं जागा राखून ठेवणें अगर देणें;

( २ ) राखीव जंगल नसलेल्या जंगलाची व्यवस्था;

( ३ ) शेतकीसाठीं कालवे अगर पाट यांचा उपयोग;

( ४ ) झुमपद्धतींचें अगर आलटून पालटून करावयाच्या लागवडीच्या इतर पद्धतींचें नियमन;

( ५ ) ग्रामपंचायती अगर नगरसमित्या यांची स्थापना व अधिकार;

( ६ ) ग्राम पोलिस अथवा नगर पोलीस, सार्वजनिक आरोग्य व स्वच्छता इत्यादि कारभाराच्या बाबी;

( ७ ) प्रमुख अगर नायक यांच्या नेमणुका;

( ८ ) मालमत्तेचा वारसा;

( ९ ) विवाह;

( १० ) सामाजिक चालीरीती.

कौन्सिलनें पास केलेल्या दरएक कायद्याचा मसुदा गव्हर्नरकडे पाठवण्यांत आला पाहिजे आणि गव्हर्नरनें संमति दिली तरच त्याला कायद्याचें स्वरूप येईल.

दरएक कौन्सिलला आपापल्या क्षेत्रांत ग्रामपंचायती अगर कोर्ट स्थापन करण्याचा अधिकार आहे आणि न्यायदानाचें काम त्यांनीं करावयाचें आहे. कौन्सिलला अपील कोर्ट स्थापन करण्याचा अधिकार आहे किंवा स्वतांच अपीलकोर्ट बनण्याचा अधिकार आहे. सुप्रीमकोर्ट व हायकोर्ट यांखेरीज इतर कोर्टांची हुकमत या स्वायत्त जिल्ह्यांत किंवा प्रदेशांत चालावयाची नाहीं. आसामच्या हायकोर्टानें या प्रदेशांतील दाव्यांबाबत कोणच अधिकार वापरावे हें गव्हर्नर ठरवणार. ग्रामपंचायती अगर कोर्ट कशीं नेमलीं जावीं, त्यांनीं कोणत्या नियमानुसार काम चालवावें, अपील कोर्टानें कसें काम चालवावें, अपील कोर्ट म्हणून कौंसिल बसेल त्यावेळीं त्यानें कसें काम चालवावें, अदालतीचे हुकुमनामे अंमलांत कसे आणावे आणि तत्सम

बाबी, यांसबंधीं नियम करण्याचा अधिकार कासिलला आहे. मात्र या नियमांना गव्हर्नरच्या मंजुरीची आवश्यकता आहे. या परिच्छेदानुसार स्थापन झालेल्या कोर्टांना कांहीं जादा अधिकार गव्हर्नर देऊं शकतो.

प्राथमिक शाळा, दवाखाने, बाजार, कोंडवाडे, नदींत फिरणाऱ्या नावा' मासे धरण्याचीं ठिकाणें, रस्ते व जलमार्ग यांसंबंधींचे अधिकार दरएक कौन्सिलला आहेत.

प्रत्येक स्वायत्त जिल्ह्यासाठीं एक जिल्हा-निधि व प्रत्येक स्वायत्त प्रदेशासाठीं एक प्रदेशनिधि स्थापन करण्यांत येईल. जिल्ह्यांतील किंवा प्रदेशांतील जमिनीवरील साऱ्याची आकारणी आणि वसुली करण्याचा अधिकार कौन्सिलला आहे. याशिवाय घरभाडें जमिनी व इमारती यांवरील कर आणि डोईपट्टी वसूल करण्याचाहि अधिकार कौन्सिलला आहे. ( १ ) व्यवसाय, व्यापार, उद्योग व नोकरी यांवर कर, ( २ ) जनावेरें, वाहनें व नावा यांवर कर, ( ३ ) बाजारांत विक्रीसाठीं येणाऱ्या मालावर कर, नावांतून जाणारे उतारू व माल यांवर पट्टी, आणि ( ४ ) शाळा, दवाखाने व रस्ते सुस्थितींत ठेवण्यासाठीं कर, बसवण्याचा व वसूल करण्याचा अधिकार केवळ जिल्हा कौन्सिलला आहे.

कोणत्याहि स्वायत्त जिल्ह्यांत खनिज संपत्तीची पाहणी अगर उत्खनन करण्याचे परवाने दिले असल्यास त्यांपासून होणाऱ्या उत्पन्नाचा विशिष्ट हिस्सा कौन्सिलला मिळाला पाहिजे. आसाम सरकार आणि जिल्हा कौन्सिल यांनीं करार करून किती हिस्सा कौन्सिलला देण्यांत यावा हें ठरवावें. जर दोन पक्षांमध्यें मतभेद झाला तर गव्हर्नरनें निर्णय द्यावा. तो निर्णय दोनहि पक्षांना बंधनकारक होईल. अशा निर्णयासंबंधीं गव्हर्नरला सल्ला देण्याचा हक्क मंत्रिमंडळास नाहीं.

आदिवासीशिवाय दुसऱ्या कोणत्याहि जातीच्या लोकांनीं सावकारी अगर इतर धंदा केला तर त्याचें नियंत्रण करण्याचा अधिकार कौन्सिलला आहे. मात्र अशा नियंत्रणासाठीं जे नियम करावयाचे त्याला कौन्सिलच्या एकंदर सभासदांच्या तीन चतुर्थांश सभासदांचा पाठिंबा पाहिजे. शिवाय या नियमांना गव्हर्नरची मंजुरी पाहिजे. कौन्सिलनें पास केलेले सर्व कायदे, कानू आणि नियम, आसामराज्याच्या गॅझेटमध्यें सिद्ध करण्यांत आले पाहिजेत.

ज्या बाबींसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार कौन्सिलला आहे त्यांसंबंधीं आसामच्या कायदेमंडळानें केलेले कायदे कोणत्याहि स्वायत्त जिल्ह्यांत जिल्हा-कौन्सिलच्या संमतीशिवाय लागू करतां येणार नाहींत. आसामच्या कायदे-मंडळानें इतर बाबींसंबंधीं केलेले कायदे स्वायत्त जिल्ह्यांपुरते रद्द करण्याचा किंवा त्यांत बदल करण्याचा अधिकार गव्हर्नरास आहे.

आसामच्या बजेटमध्यें दरएक स्वायत्त जिल्ह्यासाठीं किती रक्कम घालावी हें ठरवण्यापूर्वी प्रांतिक सरकारनें त्या त्या जिल्ह्यांच्या कौन्सिलचा सल्ला घेतला पाहिजे.

स्वायत्त जिल्ह्यांची एकंदर पाहाणी करण्यासाठीं गव्हर्नरला केव्हांहि कमिशन नेमण्याचा अधिकार आहे. विशेषेंकरून शिक्षण, औषधोपचार आणि वाहतुकीचीं साधनें आणि कौन्सिलांनीं केलेल्या कायदेकानूंची अंमलबजावणी यांची पहाणी करण्यासाठीं कमिशन नेमलें पाहिजे. स्वायत्त जिल्ह्यांसाठीं कांहीं नवीन किंवा खास कायदे केले पाहिजेत कीं काय याची चौकशीसुद्धां या कमिशननें केली पाहिजे. या कमिशनचा रिपोर्ट, त्याबद्दल केलेल्या गव्हर्नरच्या शिफारसी आणि आसामसरकार त्याबाबत काय करतें याचा अहवाल, मंत्र्यानें कायदेमंडळापुढें ठेवला पाहिजे. मंत्रिमंडळापैकीं एका मंत्र्याकडे हें खातें स्वतंत्रपणें सोंपवण्याची गव्हर्नरनें व्यवस्था केली पाहिजे.

आसाम हा सीमाप्रांत असल्यामुळें एक खास व्यवस्था करणें भाग पडलें आहे. स्वायत्त जिल्ह्याच्या अगर प्रदेशाच्या कौन्सिलनें केलेल्या कायदेकानूमुळें भारताच्या सुरक्षिततेला धोका उत्पन्न होण्याचा संभव आहे असें गव्हर्नरास वाटलें तर तो कायदा अगर नियम रद्द करण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे. आपलीकडे जाऊन एकादें कौन्सिल बरखास्त करणें अवश्य आहे असें त्याला वाटलें तर तो तसें करूं शकेल. कौन्सिल बरखास्त केल्यास त्याचे अधिकार आपलेकडे घेण्याचाहि गव्हर्नरास अधिकार आहे.

स्वायत्त जिल्ह्यांची पाहणी करण्यासाठीं नेमलेल्या कमिशननें जर शिफारस केली तर कोणच्याहि जिल्हाकौन्सिलचें किंवा प्रदेशकौन्सिलचें विसर्जन कर-ण्याचा अधिकार गव्हर्नरास आहे. विसर्जनानंतर नव्या निवडणुकी करून

दुसरें कौन्सिल स्थापण्याची व्यवस्था करणें किंवा कायदेमंडळाच्या संमतीनें कौन्सिलाचे अधिकार आपलेकडे घेणें हें गव्हर्नरच्या मर्जीवर अवलंबून राहील.

आसामच्या कायदेमंडळाच्या निवडणुकीबाबत गव्हर्नर असें जाहीर करूं शकेल कीं स्वायत्त जिल्ह्यांतील एकादा टापू राखीव जागा भरण्याकरितां बनवलेल्या मतदारसंघांत समाविष्ट करतां येणार नाहीं.

वर दिलेले कायदे ‘ ब ’ विभागांतील प्रदेशांना लागू करण्याचा अधिकार आसामच्या गव्हर्नरास आहे; मात्र तत्पूर्वी गव्हर्नरनें राष्ट्रपतीची मंजुरी मिळविली पाहिजे. सर्वच्या सर्व नियम लागू केले पाहिजेत अशी गव्हर्नरावर सक्ति नाहीं. या कामासाठीं जरूर तो वटहुकूम काढीपर्यंत या प्रदेशांतील राज्यकारभार राष्ट्रपतीचा प्रतिनिधि या नात्यानें गव्हर्नरनें चालवावा. हा राज्यकारभार चालवतांना मंत्रिमंडळाचा सल्ला ऐकावयास गव्हर्नर बांधलेला नाहीं.

या परिशिष्टांतील नियमांप्रमाणें निवडणुकी आणि नेमणुका होऊन जिल्हा कौन्सिलें व प्रदेशकौन्सिलें स्थापन व्हावयास कांहीं अवधि लागणार. त्या अवधींत या प्रदेशाचा राज्यकारभार पाहण्याचा अधिकार गव्हर्नरकडे आहे. या संक्रमणाच्या मुदतींत पार्लमेंटच्या अगर आसामच्या कायदेमंडळाचा कोणचाहि कायदा गव्हर्नरच्या हुकमाशिवाय या प्रदेशांत लागू होणार नाहीं. कोणचाहि कायदा लागू करतांना तो तसाच्या तसा लागू करण्याचा किंवा त्यांत फेरबदल व अपवाद करून लागू करण्याचा अधिकार गव्हर्नरास आहे. याशिवाय या प्रदेशाच्या राज्यकारभारासाठीं कानू ( रेग्युलेशन ) करण्याचा अधिकार गव्हर्नरास आहे, रेग्युलेशन करतांना पार्लमेंटनें अगर आसामच्या कायदेमंडळानें केलेला अगर हल्लीं अंमलांत असलेला कोणचाहि कायदा दुरुस्त करण्याचा अगर अजीबात रद्द करण्याचा अधिकार गव्हर्नरास आहे. मात्र हरएक रेग्युलेशनला राष्ट्रपतीच्या संमतीची आवश्यकता आहे.

या परिशिष्टांत वाटेल तो फरक करण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे. असा फरक करणें म्हणजे घटनेची दुरुस्ती करणें असें समजण्यांत येणार नाहीं.

---

## परिशिष्ट सात

# घटकराज्यांचें अधिकारक्षेत्र

**( भाग अकरावा पृ. ७१ पहा )**

संघ व घटक यांच्यामध्यें जी अधिकारविभागणी केलेली आहे तिचा उहापोह अकराव्या भागांत आला आहे. घटनाकायद्याच्या २४६ व्या कलमान्वयें सबंध अधिकारक्षेत्राच्या तीन वांटण्या केल्या आहेत आणि त्यांना अनुसरून तीन याद्या तयार केल्या आहेत. या तीनहि याद्या सातव्या परिशिष्टांत दिल्या आहेत. यांपैकीं दुसरी यादी म्हणजे सामान्यतः घटकराज्यांचें अनन्य अधिकारक्षेत्र आहे. 'सामान्यतः' म्हणण्याचें कारण असें कीं या क्षेत्रावरहि आक्रमण करण्याचा अधिकार कांहीं प्रसंगीं संघाकडे जातो. घटकाकडे नसलेला सर्व अधिकार संघाकडे आहे हें यापूर्वी अनेक वेळां स्पष्ट करण्यांत आलें आहे. इतकेंच नव्हे तर घटकांकडे असणारा कांहीं अधिकार संघाकडे मुद्धां आहे. अशा अधिकारक्षेत्राची तिसरी यादी तयार करण्यांत आली आहे व तिला समवर्ती यादी म्हटलें आहे. एकाच अधिकारक्षेत्रावर दोन अधिकारीसमष्टि आल्या म्हणजे त्यांच्यामध्यें विरोध वा बेबनाव होण्याचा संभव आहे. त्यासंबंधीं कलम २५४ मध्यें व्यवस्था केलेली आहे. सामान्यतः ती व्यवस्था अशी आहे कीं तिसऱ्या यादींतील कोणत्याहि बाबीसंबंधीं जर पार्लमेंटानें व घटकाच्या कायदेमंडळानें कायदे केले असतील आणि त्यांमध्यें बेबनाव वा विरोध असेल तर पार्लमेंटाचा कायदा वरचढ समजला पाहिजे. या म्हणजे समवर्ती (तिसऱ्या) यादींतील कोणच्याहि बाबीसंबंधीं घटकाच्या कायदेमंडळानें केलेला कायदा रद्द करण्याचा संपूर्ण अधिकार पार्लमेंटास आहे. भारताच्या नव्या घटनेचें हें वैशिष्टय आहे. असें असल्यामुळें तीन याद्या या पुस्तकांत प्रसिद्ध करण्याची अवश्यकता वाटली नाहीं. सामान्यतः जें घटकाचें 'अनन्य' अधिकारक्षेत्र आहे तें देणें अवश्य वाटलें, म्हणून याखालीं घटनाकायद्याच्या सातव्या परिशिष्टांतील यादी नं. २ तेवढीच देण्यांत येत आहे.

## यादी २

१ सार्वजनिक सुव्यवस्था ( मात्र यांत मुलकी राज्यव्यवस्थेच्या सहाय्यासाठीं लष्करी, आरमारी अगर हवाई दलाचा अगर संघराज्याच्या इतर सशस्त्र फौजेचा उपयोग अंतर्भूत नाहीं ).

२ पोलीस, यांत रेल्वे पोलीस व गांव पोलीस यांचा समावेश आहे.

३ न्यायदान, सुप्रीम कोर्ट व हायकोर्ट यांच्याव्यतिरिक्त इतर सर्व कोर्टांची स्थापना व घटना, भाडें–कोर्ट आणि जमीनमहसूल–कोर्ट यांची कामकाज पद्धति; हायकोर्टाचे अधिकारी व नोकरवर्ग, सुप्रीम न्यायालयाखेरीज इतर कोर्टांत घेण्यांत येणारी फी.

४ तुरुंग, बालगुन्हेगारांच्या शाळा, बोर्स्टल संस्था व तत्सम इतर संस्था आणि त्यांत ठेवलेल्या व्यक्ति; तुरुंग आणि इतर संस्था यांच्या उपयोगाच्या बाबतींत इतर राज्यांबरोबर केलेली व्यवस्था.

५ स्थानिक स्वराज्यसंस्था म्हणजे नगरपालिका, इंप्रुव्हमेंटट्रस्ट, जिल्हाबोर्ड, खाण–वसाहतीमधील स्थानिक संस्था आणि स्थानिक स्वराज्य अगर ग्रामपंचायत यासंबंधींच्या संस्था, यांची स्थापना व त्यांचे अधिकार.

६ सार्वजनिक आरोग्य आणि स्वच्छता; रुग्णालयें व दवाखाने.

७ हिंदुस्थानाबाहेरील स्थळांच्या यात्रा सोडून इतर सर्व यात्रा.

८ मादक पेयें. म्हणजे मादक पेयें निर्माण करणें, तयार करणें, जवळ बाळगणें, बाहेर पाठविणें, विकणें अगर विकत घेणें.

९ पंगु व काम करण्यास असमर्थ यांना सहाय्य.

१० दफन व दफनभूमि, दहन आणि स्मशानभूमि.

११ सूची १ मधील ६३, ६४, ६५ व ६६ व सूची ३ मधील २५ या कलमांत निर्दिष्ट केलेल्या शर्तींनुसार विद्यापीठासह शिक्षण.

१२ घटकसरकारनें आर्थिक सहाय्यानें चालविलेल्या अगर त्याच्या नियंत्रणाखालीं असलेल्या ग्रंथालयें, पुराणवस्तुसंग्रहालयें व तत्सम इतर

संस्था, पार्लमेंटनें कायद्यान्वयें राष्ट्रीय महत्त्वाच्या म्हणून जाहीर केलेल्याव्यतिरिक्त अन्य प्राचीन ऐतिहासिक स्मारकें व कागदपत्रें.

१३ दळणवळणाचीं साधनें म्हणजे संघसरकारच्या हुकमतींत वा व्यवस्थे-खालीं नसलेले रस्ते, पूल, नावा आणि दळणवळणाचीं इतर साधनें, म्युनिसिपालिटीच्या ट्रॅमगाड्या, दोरावरील वहातुकीचा मार्ग, अंतर्गत जलमार्ग व त्यावरील वहातूक ( कांहीं प्रमाणांत ), यंत्रशक्ती-वर न चालणारीं वाहनें.

१४ शेतकी, यांत शेतीशिक्षण, संशोधन, संहारक कीटकांपासून पिकांचें संरक्षण व पिकांवरील रोगांचा प्रतिबंध या गोष्टींचा समावेश आहे.

१५ गुरांची निगा, संरक्षण आणि सुधारणा, आणि गुरांच्या रोगांचा प्रतिबंध; पशुवैद्यकीचें शिक्षण व व्यवसाय.

१६ कोंडवाडे व गुरांच्या अतिक्रमणाविरुद्ध प्रतिबंधक योजना.

१७ पाणी, म्हणजे पाणीपुरवठा, कालवे व धरणें, ड्रेनेज व बंधोर, पाण्याचे सांठे आणि जलशक्ति.

१८ जमीन म्हणजे जमिनींतील व जमिनीसंबंधीचे हक्क, जमीनदार व रयत यांमधील संबंधासह; जमीनधारापद्धति; जमिनीच्या खंडाची वसुली; शेतजमिनीची फारकत किंवा बदली; जमिनीची सुधारणा आणि शेतीसाठीं कर्ज, वसाहत करणें.

१९ जंगलें.

२० रानटी पशूंचें व पक्ष्यांचें रक्षण.

२१ मच्छीमारी.

२२ कोर्ट ऑफ् वॉर्ड्स्, बोजाखालीं असलेली व जप्त झालेली मालमत्ता.

२३ खाणींचें नियमन व खनिज वस्तूंची वाढ ( कांहीं प्रमाणांत ).

२४ उद्योगधंदे ( कांहीं प्रमाणांत ).

२५ गॅस व गॅसचे कारखाने.

२६ अंतर्गत व्यापार व देवघेव ( कांहीं प्रमाणांत ).

२७ मालाचें उत्पादन, पुरवठा व वांटप ( कांहीं प्रमाणांत ).

२७ बाजार आणि जत्रा.

२९ प्रमाणस्थापनेखेरीज वजनें आणि मापें.

३० सावकारी व सावकार; शेतकरी व कर्जनिवारण.

३१ खानावळी व खानावळींचे मालक.

३२ संघाकडे न सोपवलेल्या कंपन्या आणि विद्यापीठें यांची स्थापना, नियमन व विसर्जन, कंपन्यांमध्यें ज्यांचें रूपांतर झालें नाहीं अशा व्यापारी, साहित्यविषयक, शास्त्रीय, धार्मिक व इतर संस्था आणि मंडळ्या; सहकारी पतपेढ्या.

३३ नाटकगृहें आणि नाटकें; सांघिक क्रीडा, करमणुकी व इतर मनोविनोदनाचे कार्यक्रम, चित्रपट ( कांहीं प्रमाणांत ).

३४ सट्टे आणि जुगार.

३५ घटकसरकारच्या मालकीचें किंवा ताब्यांतील बांधकाम, जमिनी व इमारती.

३६ मालमत्ता संपादन करणें अगर सक्तीनें ताब्यांत घेणें ( कांहीं प्रमाणांत ).

३७ पार्लमेंटनें केलेल्या कायद्याला अनुसरून कायदेमंडळाच्या निवडणुकी.

३८ घटकाच्या कायदेमंडळांतील सभासद, लोकसभेचे अध्यक्ष व उपाध्यक्ष, आणि कौन्सिल असल्यास त्याचे सभापति व उपसभापति यांचे पगार आणि भत्ते.

३९ लोकसभा, तिचे सभासद, आणि कमिट्या आणि कौन्सिल असल्यास, त्याचे सभासद, आणि कमिट्या यांचे अधिकार, विशेष अधिकार आणि संरक्षणें; कायदेमंडळांतील कमिट्यांपुढें साक्ष देण्यासाठीं किंवा कागदपत्र हजर करण्यासाठीं हजेरीची सक्ति.

४० मंत्र्यांचे पगार व भत्ते.

४१ सरकारी नोकऱ्या व सरकारी नोकर परीक्षक मंडळ.

४२ पेन्शन.

४३ घटकाचें सार्वजनिक कर्ज.

४४ निखातनिधि.

४५ जमीनमहसूल, ज्यांत महसूल बसविणें व वसूल करणें यांचा समावेश होतो. लँड रेकॉर्ड ठेवणें, जमीनमहसुलासाठीं पहाणी करणें, हक्काची नोंद व महसूलफारकत यांचा यांत समावेश आहे.

४६ शेतीच्या उत्पन्नावरील कर.

४७ शेतजमिनीवरील वारसदारीचा कर.

४८ शेतजमिनीवरील स्वामित्वाचा कर.

४९ जमिनी आणि इमारती यांवरील कर.

५० पार्लमेंटनें कायद्यानें घालून दिलेल्या मर्यादा संभाळून खनिज द्रव्यांच्या हक्कांवरील कर.

५१ घटकराज्यामध्यें तयार केलेल्या अगर निर्माण झालेल्या खालील वस्तूंवरील अबकारी कर आणि हिंदुस्थानांत अन्यत्र तयार केलेल्या किंवा निर्माण झालेल्या वस्तूंवर त्याच किंवा कमी दरानें बसविलेलें प्रतिशुल्कः

(अ) मादक पेयें (मानवी उपयोगासाठीं).

(ब) अफू, चरस व इतर अंमली औषधें व द्रव्यें. यांत मद्यार्क असणारीं औषधें व प्रसाधनें किंवा या नोंदींतील उपपरिच्छेद (ब) मध्यें समाविष्ट केलेले पदार्थ यांचा अंतर्भाव नाहीं.

५२ स्थानिक क्षेत्रांत खप, उपयोग व विक्री यासाठीं येणाऱ्या मालावर कर.

५३ विजेच्या विक्रीवर किंवा खपावर कर.

५४ वृत्तपत्रांव्यतिरिक्त मालाची खरेदीविक्री यांवर कर.

५५ वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालेल्या जाहीरातींव्यतिरिक्त इतर जाहीरातींवर कर.

५६ अंतर्गत जलमार्गानें किंवा खुष्कीनें नेण्यांत येणाऱ्या मालावर व उतारूंवर कर.

५७ रस्त्यावर चालविण्याकरितां उपयुक्त असणाऱ्या वाहनांवर कर, मग हीं वाहनें यांत्रिक शक्तीनें चालणारीं असोत अगर नसोत, आणि ( कांहीं प्रमाणांत ) ट्रामगाड्या.

५८ जनावरें व नावा यांवर कर.

५९ टोलनाकीं.

६० धंदे, व्यापार, उद्योग व नोकरी यांवर कर.

६१ डोईपट्टी.

६२ चैनीच्या वस्तूंवर कर. यांत करमणुका, मनोविनोदन, सट्टा व जुगार यांवरील कराचा अंतर्भाव होतो.

६३ दस्तऐवजांवरील स्टँपकराचे दर ( कांहीं मर्यादा संभाळून ).

६४ या सूचींतील कोणत्याही बाबीसंबंधींच्या कायद्याच्या उल्लंघनाचे गुन्हे.

६५ या विषयसूचींतील कोणत्याही विषयासंबंधीं सुप्रीमकोर्टाखेरीज इतर सर्व कोर्टाचें अधिकारक्षेत्र व सत्ता.

६६ कोर्टात घेतलेली फी वगळून या विषयसूचींतील कोणत्याही बाबी-संबंधीं आकारलेली फी.



# सूची

**विषय** | **पृष्ठ**

| विषय | पृष्ठ |
|---|---|

| विषय | पृष्ठ |
| --- | --- |

| विषय | पृष्ठ |
|---|---|




# शुद्धिपत्रक

| पृष्ठ | ओळ | चूक | चुकीची दुरुस्ती |
|---|---|---|---|
| २० | ६ | त्याच नागारेकत्व | त्याचें नागरिकत्व |
| २१ | ७ | प्रिंअम्बझ् | प्रिॲंबल |
| २३ | १३ | सरकारन | सरकारनें |
| २६ | ६ | आर्थिक आणि न्यायाच्या | आर्थिक आणि राजकीय न्यायाच्या |
| ३१ | ४ | व्याख्यत | व्याख्येंत |
| ३३ | ६ | कतव्य | कर्तव्य |
| ३९ | ८ | तस | तसें |
| ३९ | २४ | वष | वर्षे |
| ४७ | १ | लोकसभतील | लोकसभेंतील |
| ५० | २४ | वाचलं | वाचलें |
| ५१ | १३ | पार्लमटच्या | पार्लमेंटच्या |
| ६० | ७ | न्यायाधिशाचा | न्यायाधिशास |
| ६४ | ११ | यमानियम | यमनियम |
| ६५ | ९ | सपूर्ण | संपूर्ण |
| ६९ | २ | केलेले | केलेलीं |
| ७० | ८ | कलमांनीं या | कलमांनीं पांच व सहा या |
| ८५ | ९ | दान | दोन |
| ८७ | ७ | पडेल | पडेल. |
| ९६ | १४ | मिळून सभासदांची | मिळून तीस सभासदांची |
| १२२ | १ | कासिलला | कौन्सिलला |